

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



वर्ष २२ वें : अंक ४ रा

जानेवारी–मार्च १९५०



संपादक

अनुक्रमणिका



❀ महाराष्ट्र ❀
साहित्य-पत्रिका
वर्ष २२ वें : अंक ४ था
जानेवारी - मार्च १९५०



## फरारी—

मी आईच्या कुसव्यामाजी
पडलों होतों निर्भर हांसत
बंदिवान पण—बंदिवान पण—
तेव्हा मजला होतें वाटत.

आणि कोठल्या तरि घटकेला
आलों वाहिर विश्वामध्ये
क्षणभर हसलों—क्षणभर हसलों—
मला वाटलें—अफाट अंगण—
लाभे विश्वाचें नाचाया.

यौवन आलें जाणिव घेउनि
मग मज्जेचा झाला गुंता
गुंता सोडवितांना दुसरा
प्रज्ञेची ' लड ' टद् टद् तुटली.

पाहुं लागलों अफाटांत नी
अक्षांशांना रेखांशांना
स्वरूप आलें होतें भयकर
काटेरी ते तारा झाले.

आणि कैदि मी दुःखीकष्टी
शोधि फरारी झालेला यम
हजार ' मरणें ' रोज मनाचीं
कलाक चोविस मिरवी देहीं.

मनमोहन

# मोरोपंती आर्येतील यतिभंग : ले० : य. ग. फफे

मोरोपंत गीतीला आर्याच म्हणतात. आपल्या आर्येसंबंधाने त्यांनी "कोठें चुकली असेल यति मात्र" असें म्हटलें आहे. म्हणजे आर्येंत यति असतात असें ते मानितात आणि आपल्या आर्यांत क्वचित् यतिभंग झाला असल्याची जाणीवहि व्यक्त करितात. यति म्हणजे विच्छेद; तुकडा तुटण्याचें स्थान. हीं स्थानें निश्चित असतात. त्या स्थानीं पद पूर्ण झालेलें असलें तर कानास ठीक लागतें. पण तें अपूर्ण असलें, पदाच्या मध्यंतरींच विच्छेदाचें स्थान असलें, तर उच्चारांत विघात होतो. व अर्थबोधासहि क्वचित् थोडासा अडथळा उत्पन्न होतो. यतिस्थानावर असा जो अयोग्य पदभंग होतो त्यास यतिभंग म्हणतात. पंतांनी यति चुकली असेल असें जें म्हटलें आहे तें कोणत्या यतिस्थानास अनुसरून म्हटलें आहे याचें उत्तर, पादान्तयतीस अनुसरून, विषमपादान्तींच्या यतीस अनुसरून, असें सकृद्दर्शनी मनांत येतें. पण तें दोन कारणांनी समर्पक वाटत नाही. एक तर मराठींत वाक्यगत पदांचे संधि करून लिहीत नाहीत, यामुळे स्वाभाविकपणेंच पादान्तीं पूर्ण पदच येतें. तेथें पद अपूर्ण राहून यतिभंगदोष उत्पन्न होण्याचा संभव प्रायः नसतो. दुसरें असें की, पंतांचें काव्य संस्कृतशब्दप्रचुर असल्यामुळे त्यांत क्वचित् बारा मात्रांवर पद अपूर्ण राहिलें असणें संभवनीय मानिलें तरी तो शास्त्रतः यतिभंगदोष होत नाहींच. कारण आर्येंत बारा मात्रांवर पद पूर्ण होणें हें पैंगल छंदःशास्त्रांत आवश्यक मानिलेलें नाही. त्रिषुगणेषु पादः पथ्याऽयेच । विपुलाऽन्या । ( पिं. ४-२२ व २३ ) या सूत्रांत असें सांगितलें आहे की, आर्येत तीन गणांवर म्हणजे बारा मात्रांवर जर पाद होईल, म्हणजे तेथे पद पूर्ण झालेलें असेल, तर त्या आर्येला पथ्या म्हणावें, आणि असा पाद होत नसेल तर तिला विपुला म्हणावें. याचा अर्थ असा की, बारा मात्रांवर पद अपूर्ण राहिलें तरी तो दोष नव्हे. आर्येच्या प्रकाराचें नांव बदलेल इतकेंच. पंताच्या आर्या पथ्याच आहेत. पण त्यांच्या एखाद्या आर्येंत बारा मात्रांवर पद तुटत नसलें तर तिला विपुला असें म्हणावें लागेल इतकेंच. पण तो कांही यतिभंगदोष नव्हे. तेथे शास्त्रतः यति आवश्यकच नाही, मग यतिभंग कसा संभवणार? यावरून मोरोपंतांनी "कोठें चुकलीं असेल यति मात्र" असें जें म्हटलें आहे तें बाराव्या मात्रेस अनुसरून नसून अन्य कोणत्यातरी स्थानच्या यतीसंबंधाने असावें, असें म्हणणें प्राप्त होतें. तें कोणत्या स्थानच्या यतीविषयी आहे याचा शोध घ्यावयाचा तर गीतींत यति कोठें असतात हें पहावयास हवें व त्यासाठी प्रथम गीतीचें लक्षण पाहिलें पाहिजे.

गीतीच्या विषमपदीं द्वादशमात्रा, समीं पदीं अठरा

अशाच आशयाचें लक्षण वृत्तदर्पणादिकांत आढळतें. पण

विद्येनेंच मनुष्या आलें श्रेष्ठत्व या जगामाजी ।

याचे ऐवजीं पदें फिरवून

मनुष्या विद्येनेंच श्रेष्ठत्व या जगामाजी आलें

असें म्हटलें असतां, जरी त्यांत बारा व अठरा मात्रांचेच भाग असले तरी, ती गीति नव्हे हें कोणीहि सांगेल. अर्थात् गीतीच्या लक्षणांत आणखी कांही अटी असल्याच पाहिजेत. म्हणून आपण पिंगलोक्त लक्षणच पाहूं. तें पुढीलप्रमाणे आहे.

( १ ) गीतीच्या प्रत्येक अर्धात सात चतुर्मात्रिक गण व पुढें एक गुरु असतो.

( २ ) या सात गणांपैकीं विषमस्थानचा गण ज नसतो. आणि

( ३ ) सहावा गण ज किंवा न्ल (= चतुर्लघु) यांपैकीच असतो.

ज आणि न्ल हे गण म्हणजे आद्यंतीं लघु असलेले गण. षष्ठ गण 'आद्यंतलघु'च असावयाचा, म्हणजे गीत्यर्धातील एकविसावी व चोविसावी मात्रा लघु अक्षरानेंच व्हावयाची, हें सहज ध्यानीं येईल. गीतीचें वरील लक्षण थोडक्यांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल.

सप्त च-गण गुरुहि पुढें, विषम न ज, ज वा न्ल षष्ठ गीत्यर्धीं ।

या लक्षणावरून दिसून येईल की गीतीच्या अर्धात प्रारंभापासून चार चार मात्रांचे विभाग पडावेच लागतात. तसे ते 'मनुष्या विद्येनेंच' यांत पडत नाहीत म्हणून गीतीची चाल जमत नाही. तसेंच ह्या त्रिगणात्मक भागापुढील

४ ५ ६ ७ ग

श्रे ष्ठ ... त्व या ज ... गा मा ... जी आ ... लें

या भागात चार चार मात्रांचे गण पडत असले तरी पांचव्या म्हणजे विषमस्थानीं निषिद्ध असलेला ज गण येतो. तसेंच सहावा गण ज किंवा न्ल हवा तसा तो न येतां तेथे गामा हा द्विगुरु गण येतो म्हणून यांत गीतीची चाल जमत नाही.

याप्रमाणे गीतींतील गणनियम पाहिल्यानंतर आता तींतील पिंगलोक्त यतिनियम पाहूं. हे नियम आर्येच्या सर्व प्रकारांस सारखेच लागू आहेत, म्हणून गीति या शब्दाऐवजी आर्या हा शब्द योजण्यास प्रत्यवाय नाही.

पहिला व महत्त्वाचा यतिनियम असा:—

न्लौ चेत् पदं द्वितीयादि (पिं. ४--१८) आर्यार्धातील सहावा गण न्ल म्हणजे चतुर्लघु असेल तर त्यांतील द्वितीयाक्षरापासून पदारंभ झाला पाहिजे. म्हणजे त्या गणांतील प्रथमाक्षरावर पद पूर्ण झालें पाहिजे, म्हणजेच तेथे यति पाहिजे. हा नियम पंतांनी सर्वत्र कसोशीने पाळिला आहे. पहा:—

| | सहावा गण | | |
|---|---|---|---|
| श्रीवीरसेनसुत नळ निषधेश्वर सुगु | ण | मणिक | रंडक हो । |
| ब्रह्मण्यप्रभु दुर्गत..दारिद्र्य...समु | द्र.. | ..वर..त | रंडक हो ॥ |
| भीमनृपति दुग्धोदधि दमयंती श्री | च | वपु सु | रुचिर तिचें । |
| पाहूनि देह दिवसोंदिवस दिसे दी | न | जरि सु | रुचि रतिचें ॥ |
| देवर्षिमुखें परिसुनि शक्र करी धरु | नि | हरिख | गमनातें । |
| त्याच्या विमान येइल काय न येता | चि | हरिख | ग मनातें ॥ |
| सस्मितवदन नळ म्हणे प्रभुजी जो हे | तु | सुर..व | रागमनीं । |
| माझ्याहि तोचि सर्वांहि मृगांच्या तु | रुय | सुरव | ..राग मनीं ॥ |
| काय इणें न धरावें अधनत्वें भू.. | प.. | जन..व | रा जीवीं । |
| कां न प्राशावें मधु मधुपानें कू | प.. | ..ज नव | राजीवीं ॥ |
| मुनि म्हणाति अनुभवावें स्वस्थमनें रा | ज्य | पद न | ता राया । |
| न तपोवन वर तुज बहु सावित्रीयु | क्तः | ..सदन | ताराया ॥ |

( हीं व या लेखांतील पुढीलहि सर्व उदाहरणें नवनीतांतीलच आहेत.) या उदाहरणांत सहाव्या गणांतील प्रथमाक्षरावर पद तुटलें आहे. षष्ठ गण न्ल असलेल्या सर्व आर्यांत असेंच प्रथमाक्षरावर पद पूर्ण झालेलें नियमाने आढळतें. आर्या म्हणण्याचे चालीस या स्थळीं अल्प यति घेणें आवश्यकच असतें, हेंहि लक्षपूर्वक आर्या म्हणून पाहिली असतां ध्यानीं येतें. आर्येंतील अठरा मात्रांच्या विभागाचे नऊ नऊ मात्रांचे दोन समान तुकडे या स्थळीं पडतात. आणि त्यांतील दुसऱ्या तुकड्याचें प्रथमाक्षर तत्पूर्वीच्या अक्षराहून उच्च स्वरांत म्हटलें जातें हेंहि येथे यति घेण्यास कारणीभूत होतें. सहावा गण ज असतो तेव्हा हें दुसऱ्या तुकड्याचें प्रथमाक्षर गुरु असल्यामुळे तत्पूर्वी यतीची तादृश आवश्यकता भासत नाही.

आर्येंतील दुसरा यतिनियम **सप्तमः प्रथमादि** ( पिं.४–१९ ) या सूत्रांत सांगितला आहे. आर्येंतील सातवा गण जर न्ल म्हणजे चतुर्लघु असेल तर त्याचे प्रथमाक्षरापासूनच पदारंभ व्हावा म्हणजे सहाव्या गणाचे अन्तीं पद पूर्ण व्हावें, तेथे यतिस्थान येतें, असा या नियमाचा आशय आहे. तो पडताळण्यासाठी उत्तर गोग्रहणांतील पुढील आर्या पहा.

सप्तमगण

सहसा व्रजांत गाठुनि बहु ताडुनि करुनि बद्ध | भुज गवळी ।
षष्टिसहस्र सुगोधन तो कुरुकुळ-चंदन- द्रु.. | ..भुजग वळी ॥
कृष्णा म्हणे बहु बरें व्हा मारुत ही पलाल | खळबळ तें ।
मद्धृदय न अरिसैन्यें तुमच्या दैन्येंचि फार | खळबळतें ॥
उठल्या उत्साहाच्या त्या शांत श्रीमदुदधि | वरि लहरी ।
धरितां हनु ननु म्हणतां प्रणताचें कां न सुदाधि | वरिल हरी ॥
कुरुकटकासि पहातां तो उत्तर बाळ फार | गडबडला ।
स्वपरबळाबळ नेणुनि बालिश बहु बायकांत | बडबडला ॥
पावोनि सर्व माहितें विगुणाहि गुरूसि जे कु | लज नर ते ।
सत्कारिति अलि कमळीं तेवीं गुरुपदीं महाकु | लजन रते ॥
मग गगन-ग-नग-भिन्मुख-सुरमत गुरुसीहि अनव | मुनि नर तो ।
कलह करी कीं इतरीं गुरुकलहीं यासि जन व | मुनि न रतो ॥

यांतील १ ते ८ व ११ या नऊ आर्यार्धांत सहाव्या गणाचे अन्तीं पद पूर्ण झालेलें आहे. पण बाकीच्या तिहींत तें पूर्ण झालेलें नसल्यामुळे यतिनियम मोडला गेला आहे. आणि अशीं हा यतिनियम पाळला न गेल्याचीं उदाहरणें विपुल आढळतात. सहाव्या सातव्या गणांतील अक्षरें यमकाच्या कचाटींत सांपडतात. दीर्घयमक साधावें तर यतिनियमाचा भंग होतो आणि यतिनियम पाळावा तर दीर्घयमक साधत नाही, असें द्वंद्व येथे प्राप्त होतें. यांत पंतांचा यमकाचा हव्यास प्रभावी होऊन यतिनियम दुर्लक्षिण्याचें त्यांनी पतकरलें असावें असें म्हणतां येईल.

पिंगलाने तिसरा यतिनियम **अन्त्ये पंचमः** ( पिं.४–२० ) या सूत्राने असा सांगितला आहे की, आर्येच्या उत्तरार्धांत पांचवा गण चतुर्लघु असेल तर त्यांतील प्रथमाक्षरापासून पदप्रारंभ व्हावा म्हणजे चतुर्थ गणाचे अन्तीं पद तुटावें. (उदाहरणार्थ घेतलेली पुढील प्रत्येक ओळ हें आर्येचें उत्तरार्ध आहे हें ध्यानीं घेउन तें त्या तऱ्हेने वाचावें.)

पांचवा गण

| | |
|---|---|
| शकुनि जातांच बहु प्रेमें | जरि सतत सांखिली असती ॥ |
| सभ्यांसि निर्णयार्थं प्रार्थुनि | पुनरपि अशंकित वदे ती ॥ |
| धृतराष्ट्र सुतांत तसा एकाचि | नयनिपुण-नायक विकर्ण ॥ |
| नग्न सभेंत कराया पाहे | खळ धरुनि हा निरी तीची ॥ |

या उदाहरणांत हा तिसरा यतिनियम साहजिकपणेंच पाळला गेला आहे. पण तो पाळला न गेल्याचींहि उदाहरणें विपुल आढळतात. यमक साधण्यासाठीं पंतांनीं हा नियम दुर्लक्षिला अशी सबबहि सांगतां येण्याजोगी नाहीं. कित्येक स्थळीं तर तो नियम सहज पाळतां येण्याजोगा असतांहि पाळलेला नाहीं. उदाहरणार्थः—

पांचवा गण

| | |
|---|---|
| दुर्योधनासि जैसा दे भी | म न हरिस तेविं हरिस पवी ॥ |
| ,, ,, भीष्म न | दे ,, ,, ,, ,, ,, |
| मेरु असो बहु हेंही जरि लं | घुनि कुलगिरीसि पंगु निघे ॥ |
| ,, ,, ,, ,, लंघुनि | जरि ,, ,, ,, ,, |
| सोड इला वेड्या बुध न कुसं | गति धरुनि काळजी वाहे ॥ |
| ,, ,, ,, ,, धरुनि कु | संगति न ,, ,, |

याप्रमाणें किंचित् फेरफार करून त्याच शब्दांत हा नियम सहज पाळतां येण्याजोगा असतांहि पंतांनी तो पाळला नाहीं यावरून त्यांस तो नियम तितकासा महत्त्वाचा वाटला नसावा म्हणूनच त्यांनीं तो ग्राह्य मानिला नाहीं असें म्हणावें लागतें.

वरील विवेचनावरून दिसून येईल कीं, पिंगलाचे छंदःशास्त्रास अनुसरून जिला **पथ्यागीति** म्हणतां येईल तोच प्रकार मोरोपंतांनी आर्याभारतादिकांत योजिला आहे. पथ्यागीतीलाच ते आर्या असें म्हणतात व तेंच नांव आतां मराठींत रूढ झालेलें आहे. पिंगलप्रयुक्त तीन यतिबंधनांपैकीं एकच म्हणजे चतुर्लघु षष्ठगणांतील प्रथमाक्षरावर यति, एवढेंच यति बंधन पंतांनी राखलें आहे आणि बाकीच्या दोन बंधनांतून आर्येला मुक्त करून तिच्या संचारास अधिक मोकळीक करून दिली आहे. पंतांनी मराठींत सुप्रतिष्ठित केलेल्या या आर्याछंदाचें संपूर्ण लक्षण पुढीलप्रमाणें सांगतां येईल.

सप्त च-गण गुरुहि पुढें, विषम न ज, ज वा न्ल षष्ठ आर्यार्धीं।
अन्यहि विक्षेप देखा षष्ठ न्ल तरी पद द्वितीयादि ॥

'आर्यार्धीं' याचेऐवजी 'गीत्यर्धीं' असें म्हटलें तरी चालेल. पंतांच्या आर्येतून निर्गत झालेलें हें लक्षण ध्यानीं घेऊन यतिभंग शोधावयाचा तर तो चतुर्लघु षष्ठगणांतच शोधावा लागेल. त्याचें पुढील उदाहरण देतां येईल.

षष्ठ गण

उठल्या उत्साहाच्या त्या शांत श्री : म : दुदधि : वरि लहरी ।

यांत **मदुदधि** हा षष्ठ गण होय; यांतील प्रथमाक्षरावर पद तुटत नाहीं, म्हणून येथे यतिभंग झाला आहे. पंतांनी "कोठें चुकली असेल यति मात्र" यांत निर्देशिलेला यतिभंग हा अशाच स्थळचा म्हणजे चतुर्लघु षष्ठ गणांतलाच असावा.

अनुक्रमणिका

# ललितरहस्य

( उत्तरार्ध )

ले०— डॉ. म. वि. आपटे,
बी. एॅससी.; एम्. बी. बी. एस्.
कैवल्यधाम, लोनावळे.

## श्राव्य लालित्य

कांही दृश्य ललित असतें तसें कांही श्राव्यहि ललित असतें. दर्शन सौकर्य हें जसें दृश्यलालितांचें रहस्य आहे तसें श्रवणसौकर्य हें श्राव्यललितांचें रहस्य आहे काय ! दृश्य दर्शनास जेंसे आयास पडतात तसे श्राव्यश्रवणास आयास पडत असले तर सौकर्याने लालित्य उत्पन्न व्हावें हें साहजिक आहे. प्रकाशाची विशेष तीव्रता नेत्रास सुखावह आहे तशी ध्वनीची विशेष तीव्रता श्रोत्रास सुखावह आहे. त्याहून कमी नीट आकलन होत नाही आणि अधिक बाधक होते. नेत्रांत येणारा प्रकाश मर्यादित करण्याची कांही योजना नेत्रांत आहे तशी ध्वनि मर्यादित करण्याची योजना श्रोत्रांत आहे ती वापरण्यांत होणारे आयास जितके कमी तितकें लालित्य अधिक हें उघडच आहे. दृश्यस्थलाच्या अंतरानुसार तें पाहण्याकरतां कांही योजना कराव्या लागतात तशा श्राव्याच्या अंतरानुसार कराव्या लागत नाहीत. आपल्याला दोन नेत्र आहेत तसे दोन श्रोत्रहि आहेत. एकच श्राव्य दोन श्रोत्रांवर पोचलें असतांना त्या दोन ठिकाणच्या तीव्रतेंत फरक पडतो. डावी-कडून आवाज येत असला तर डाव्या कानावर तो जितक्या तीव्रतेने पोचतो तितक्या तीव्रतेने उजव्यावर पोंचत नाही. यावरून आवाज डावीकडून येत आहे असें आपणास समजतें. थोडी मान हलवून वेगवेगळया कलानें कानोसा घेतला म्हणजे आवाजाचा उगम कोणत्या दिशेंत आहे हें आपणास समजतें. निरनिराळया ठिकाणाहून कानोसा घेतला असतां श्राव्याचें अंतर समजूं शकतें. दृश्य बिंबांतील वेगवेगळया टिंबांचें अवलोकन केल्याने बिंबाच्या आकार-आकृतींचें ज्ञान होतें आणि त्यातच बरेच लालित्योद्पादक गुण असूं शकतात. श्राव्य बिंबाचें अशा प्रकारचें ज्ञान श्रोत्रास होत नाही. त्यामुळें तदाश्रयी लालित्य उत्पन्न होत नाही.

## श्राव्य विशेष

श्राव्याला आकृति नसल्यामुळे त्याचे विभाग वर-खालीं डावे उजवे असे नसले तरी कालगत्या ते पूर्व-उत्तर असे असूं शकतात. आणि त्यांतील एकविधता-विविधता यामुळे लालित्य उत्पन्न होऊं शकतें. नेमक्या रचनेचे विभाग, त्यांत कांही एकविधता कांही विविधता, यांवर सर्व पद्यांची माधुरी अवलंबून असते. जें सुरावर गातां येतें तेंच पद्य. त्यांतच श्राव्य लालित्य असतें. स्वरांचें गुरुलघुत्व जमेस धरून एक विशेष नियमबद्ध संच पुनः पुनः आणावयाचा आणि त्यांत विविधता आणणें तीहि नियमबद्धच असावयाची, अशी पद्यांची रचना असते. सर्वांत साधें मराठी पद्य म्हणजे अभंग आणि ओवी. यांत कांही खंड स्वर-रचनेने सारखे सारखे आणि एक बिनसारखाहि असतो. एकविधता आणि विविधता दोनहि यांत साधले जातात. अनेक ओव्या किंवा अभंग लागोपाठ म्हणण्याने, एका ओवीं-तलीच विविधता पुनः पुनः आल्याने , तीहि एकविधताच होऊन पुनः कंटाळवाणीच होते. ती टाळावयाची तर निराळा छंदच वापरावा लागतो. महाभारत आणि रामायण या महा-काव्यांत बहुधा अनुष्टुभ् हा साधा छंदच वापरला आहे. परंतु मधून मधून दुसरे लांबट

छंद गोविले आहेत, ते कंटाळा टाळून लालित्य टिकवून धरतात. रघुवंश आणि कुमारसंभव हीं जीं दोन महाकाव्यें आहेत त्यांत कवीने प्रत्येक सर्गांत वेगवेगळें वृत्त योजिलें असून, निदान शेवटचा एक तरी श्लोक इतराहून वेगळ्या व्यंवट छंदांत रचिला आहे, त्यामुळे या काव्यांत भरपूर श्राव्यलालित्य आलें आहे. मराठी महाभारतांतील थोडीशीं उदाहरणें येथे पुरेशीं आहेत.

( अभंग + ओवी ) पति पुत्र बंधू । मज नसे कोणी ।
ऐक चक्रपाणी । हाक माझी ॥

( गीति ) उगवेल पश्चिमदिशीं सूर्य, चळेलहि गिरी, वरिहि नाही ।
वचन ढळायाचें हें, धर्मी जय, यांत संशयचि नाही ॥

( अनुष्टुभ् ) सिद्ध पांडव सामातें, अथवा समराप्रती ।
व्हावें काय तुम्हा राया, सांगा मजसि संप्रती ॥

( शार्दूलविक्रीडित ) आतां अर्जुनजी तुम्ही रणमखी रक्षीन धर्मा सदा ।
सर्वा वीरगणासमक्ष सखया ऐसी प्रतिज्ञा वदा ॥

( गीति ) भेदुनि शरें उरःस्थल चळचळ वळजलधि कर्ण कंपविला ।
मूर्छित करूनि मद्रप सौभद्रें तत्प्रताप संपविला ॥
दुःशासन मग धावे सूर्य गिळायास जेवि राहु निघे ।
अभिमन्यु म्हणे देवों सत्कृत्यफळ पळ समोर राहुनि घे ॥
म्हणती हाणा मारा पाडा घ्या काय पाहता तोंडा ।
कोंडा प्राणव्यसनीं बाळ बुडो जेवि कर्दमीं धोंडा ॥

* * *

प्रथमाचि पार्थशरांच्या पटलें तम दाट दाटलें होतें ।
रवि मावळतां सहसा काळाचें वदन वाटलें हो तें ॥
दुःसहसायकाभिन्नें परिभवखिन्नें धृतप्रकटदैन्यें ।
फिरलीं दुःखनिमग्नें अर्जुनभग्नें समस्त कुरुसैन्यें ॥
फिरले हरिहतदन्ती तैसें खन्ती धरूनि जे अहित ।
ते परतले कृतार्थ प्रमुदित पार्थ स्वसैनिकासहित ॥

* * *

भूप म्हणे रे संजय जय वार्ता दूर काय तूं वदसी ।
वीर खरे ते गेले बहुत परजिती कबंधही सदसी ।
गुरु भीष्म कर्ण गेले उरले ते मृतति काय परिसों गा ।
वीर खरे ते गेले शुद्धजयश्री कधी न वरि ढोंगा ॥
विजयप्रासादाचे पडले मोडोनि भीष्मगुरु खांब ।
शोकभरे मज मूर्छा येते क्षणमात्र संजया थांब ॥

शब्द हे केवळ श्राव्याचेच नव्हे तर दृश्य-स्पृश्य अशा मूर्त पदार्थाचे तसेच अमूर्त परंतु बुद्धिगम्य भावनाचेहि वाचक बनविलेले आहेत. हे पदार्थ आणि या भावना समजावयास बरेंच शिक्षण लागतें. अर्थहीन शब्दांचें किंवा वर्णांचें गायन केवळ श्राव्यलालित्यानेंच आनंद देतें. परंतु अर्थवंत शब्दांचें आणि वाक्यांचें गायन यांच्या सांकेतिक अर्थांमुळे लालित्यांत गुणवत्तर ठरतें. सांकेतिक अर्थवत्ता हा मनुष्यवाणीचा विशेष आहे. जडसृष्टीला वाणीच नाही.

जीवसृष्टीपैकी पशुपक्ष्यांना वाणी आहे. पण त्यांच्या वाणींत वर्ण-संख्या थोडीच आहे. त्यां वर्णांना कांही सांकेतिक अर्थ असतील तरी ते थोडेच आहेत. मनुष्यवाणींत वर्ण पुष्कळ, त्यामुळे त्यांत बहुत अर्थ भरतां येतात. या अर्थवत्त्वामुळे कवनांतील लालित्यांत विशेष भर घालतां येते. परंतु अशी भर घालून जें लालित्य उत्पन्न होतें तें केवळ श्रुतिगम्य लालित्य नव्हे. तें श्रुतिद्वारें बुद्धिगम्य लालित्य असतें. माणूस जेव्हा एखादाच स्वर किंवा वर्ण आपणाशीं गुणगुणतो तेव्हा तो केवळ श्राव्य लालित्याचीच अपेक्षा करीत असतो. परंतु तो जेव्हां एखादें वाक्यबद्ध कवन गातो तेव्हा तो केवळ श्राव्य- लालित्यावर संतुष्ट नसतो. त्यास दुसरें बुद्धिगम्य लालित्यहि हवें असतें. वरील उताऱ्यांत उभय लालित्य-प्रकार प्रत्ययास येतात.

## काव्यविशेष

बुद्धिगम्य लालित्याचें तरी रहस्य काय असतें ? या प्रश्नाचा विचार केला असतां पूर्वानुभवाची अंशतः पुनरावृत्ति, विविधतामिश्र एकविधता हेंच त्याचेंहि रहस्य असल्याचें दिसून येतें. अनेक अनुभवांचा संग्रह आपल्या स्मृतिपटलावर झालेला असतो. त्यांतल्याच एखाद्याचें अंशतः पुनः संपादन होत आहे असा अनुभव येतो तो सुखावह असतो. यथातथ्य वर्णन ज्यात असतें तो लेख उत्तम समजतात, कारण जें तथ्य असतें त्याचा केव्हा तरी पूर्वी अनुभव आलेला असतो. तो ज्या लेखाच्या वाचनाने जागृत होतो तो लेख उत्तम असा निकष ठरतो. पूर्वानुभव जर नसेल तर यथातथ्य लेखहि रुचणार नाही. ज्याला पूर्वानुभव नाही त्याला मोठा ललित लेखसुद्धा अललितच वाटतो हें साहजिकच आहे. अनुभवांपैकी पुष्कळसे अनुभव दुःखप्रद असतात, सुखप्रद असे थोडेच असतात, तरीसुद्धा या दुःखद अनुभवाचें वर्णन ऐकणें सुखप्रद असतें. कारण ऐकण्याच्या प्रसंगीं दुःखाचे प्रसंग निघून गेलेले असतात. मूळचे अनुभव जरी दुःखाचे असले तरी त्यांची स्मृति कांही दुखप्रद नसते ती सुखावहच असते. असें नसतें तर शोककथा कोणी वाचल्याच नसत्या. शोककथा वाचतांना शोक मुळीच होत नाही असें नाही. शोकवृत्त ऐकतांना ऐकण्याचा स्वाभाविक परिणाम जें दुःख तें होत असतांनाच हें दुःख योग्य नव्हे, हा प्रसंग गतकालचा आहे, अशी जाणीव असतेच. सहृदय प्रेक्षक नाटकांतील शोकप्रसंग पाहतांना टिपें गाळतात, पण ते आपण होऊन तशीं नाटकें पुनः पुनः पाहतात. त्याचें कारण हें की नाटकांतील प्रसंग जरी शोकाचे असले तरी ते प्रत्यक्ष आपल्यावर किंवा कोणावरहि त्या वेळीं ओढवलेले नसतात, परंतु तसले अनुभव जगांत येतात हें आपण अनुभवाने जाणतो, आणि हा अनुभव जागृत होणें यांतच सुख वाटतें. कथेचा ओघ नीटपणें ध्यानांत आला असला तर धृतराष्ट्राच्या मुखीं कवीने घातलेली शेवटची पंक्ति वाचतांच वाचकाचाहि गळा दाटून येऊन तोहि क्षणभर थांबल्यावांचून राहत नाही. !

प्राप्तानि दुःखान्यपि दंडकेषु संचिन्त्यमानानि सुखान्यभूवन्। रघु. १४

उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, हे जे काव्यांतील विविध अलंकार म्हणून सांगतात त्यांतील रहस्य एकच आहे. पूर्वानुभवाची जागृति, किंवा विविधतामिश्र एकविधता हेंच तें रहस्य होय. एक वस्तु दुसरीसारखी आहे असें सांगितल्यानें पूर्वज्ञात वस्तूविषयींचा ओल्याचा अनुभव जागृत होतो. त्यामुळें सुख होतें. त्यांतच लालित्य असतें. कवि दाखवितो तें दोन वस्तूंतील सादृश्य रम्य असतें. सादृश्य हें तादात्म्य नव्हे. सादृश्याबरोबरच कांही विसदृशताहि असते. तशी ती असते म्हणून तर वाचकाला सादृश्य सुचविल्याखेरीज समजत नाही. सूर

सेनापती पाहिले आणि प्रासादाचे खांब पाहिले एवढ्यानेच कांही लालित्य उत्पन्न होत नाही. समर-प्रसंग वर्णन करून सेनापति पडल्याने सैन्याची कशी दुर्दशा उडाली तें सांगितल्यानंतर "सेनापति हे विजय-प्रासादाचे खांब होते, ते मोडले !" असें सांगितल्याने लालित्य उत्पन्न होतें. प्रासादाचे खांब मोडल्याने होणारी दुर्दशा पाहिलेली असली म्हणजे ही सैन्याची दुर्दशा तशीच आहे असें सांगण्यांत स्वारस्य उत्पन्न होतें. सेनापति आणि खांब यांचे आधारवस्तु या अर्थी साम्य आहे. तेवढेंच नेमकें वेचून काढून बाकीचे विसदृश गुण वर्ज करणें यांतच लालित्य आहे. उपमान आणि उपमेय यांत सादृश्य आहे आणि विसदृशताहि आहे, एकविधता आहे आणि विविधताहि आहे. केवळ श्राव्य लालित्य किंवा केवळ दृश्य लालित्य याहून प्रस्तुत लालित्य अधिक श्रेष्ठ प्रतीचें आहे. म्हणून केवळ पदलालित्यापेक्षा असें अर्थलालित्य कवीस अधिक भूषणावह समजतात. महाकवि कालिदास हा उत्कृष्ट कवि समजतात कारण त्याच्या उपमा उत्कृष्ट आहेत. अर्थलालित्यांत श्रेष्ठ ठरलेला हा कवि पदलालित्यातहि रमतो असें ठिकठिकाणीं दिसून येतें. कांही ठिकाणीं अर्थलालित्य आणि पदलालित्य यांचा हृदयंगम समागमहि त्याच्या काव्यांत दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ रामाला विश्वामित्रापासून अस्त्र मिळालें असें सांगतांना तो विश्वामित्राला सूर्य आणि रामाला सूर्यकान्त म्हणतो, पण त्या ठिकाणीं राम शब्दाऐवजी ताडकान्तक असा शब्द योजून पदलालित्यहि साधून घेतो :—

नैर्ऋतघ्नमथ मन्त्रवन्मुनेः प्रापदस्त्रमवदानतोषितात् ।
ज्योतिरिन्धननिपाति भास्करात् सूर्यकान्त इव ताडकान्तकः ॥ रघु. ११

## श्राव्य वर्णमाला

आपल्या वर्णमालेंत जे स्वर आहेत त्यांचें लक्षण असें कीं त्यांत एकच सूर सतत नियत असतो. अ, आ, ई, ऊ, ए, ओ, हे सहाच खरे स्वर होत ऐ आणि औ हे अ+ई आणि आ+ऊ असे मिश्र स्वर आहेत. व्यंजनांचा उच्चार अल्पकालिक असतो, तो स्वरासारखा चालू ठेवतां येत नाही. खाद्यपरिभाषेंत तिखट व मसाला यांना व्यंजनें म्हणतात, कारण तीं अल्प मानानेंच सेविलीं जातात आणि त्यामुळे चवीचा पालट होतो. श्राव्यपरिभाषेंतील व्यंजनें अल्पकालिक असून सूरपालट घडविणारींच आहेत. तीं श्राव्यांत विविधता उत्पन्न करतात. स्वर सहाच आहेत पण व्यंजनें ३४ आहेत. स्वर आणि व्यंजनें मिळून पूर्ण वर्ण होतात. अनेक वर्णांच्या विविध समवायानें शब्द तयार होतात,आणि त्यांना विविध अर्थ दिले जातात. नुसत्या सुरांचें श्राव्य लवकर कंटाळवाणें होतें. त्यांत व्यंजनांचा भरणा असला म्हणजे त्यांतील लालित्य अधिक टिकाऊ होतें. एकाच ललिताची पुनरावृत्ति ललित असते, पण तीहि अतिशय झाली कीं कंटाळवाणी होते. वेगवेगळीं व्यंजनें, त्यांचे विविध समूह, इत्यादींच्या साहाय्याने लालित्य पुष्कळच वाढवितां येतें. परंतु कितीहि वाढविलें तरी श्रोत्र या ज्ञानेंद्रियाला ज्ञान-ग्रहणाचाहि शीण कालांतराने येतोच.

एकच स्वर निरनिराळ्या व्यक्तींनी गाइला तर गायकाचें व्यक्तिमत्व केवळ स्वरश्रवणाने कळून येतें तें कसें ? असा प्रश्न येथे उत्पन्न होतो. त्याचें उत्तर असें की कोणताहि एक स्वर हा केवळ एकच सूर ( एकविध ध्वनितरंग ) असतो असें नाही. तो अनेक सुरांचा समवाय असतो. त्यांतला प्रधान सूर मात्र एकच असतो. त्यांत जे आनुषंगिक सूर असतात ते व्यक्तिव्यक्तींत वेगळे असतात. त्यामुळे वक्त्याचें व्यक्तित्व वाक्श्रवणानें केवळ कळूं शकतें. वाणींतील हे व्यक्तिविशेष स्वाभाविक शारीरिक घाटावर अवलंबून असतात. व्यायामाने शरीर

दृढ आणि सुंदरहि करतां येतें. परंतु या संपादित दृढतेस आणि सौंदर्यास स्वभावसिद्ध मर्यादा असते. अभ्यासाने आवाज कमावतां येतो, पण अशा कमाईस स्वभावसिद्ध मर्यादा असते. म्हणून उत्तम कलावन्तास उपजत देणगी आणि कमाई या दोनहि गोष्टींची आवश्यकता असते.

## उपसंहार

प्रकाशांतले जसे काही वर्ण स्वभावतः ललित असतात तसे ध्वनींतले कांही वर्ण स्वभावतः ललित असतात. तांबडा, हिरवा, निळा या वर्णांमध्ये दीपक, तोषक, शामक असे गुण असतात तसे कांही सुरांमध्येहि दीपक, तोषक, शामक गुण असतात. हे गुण जाणून कलावन्त त्यांची योजना प्रसंगानुरोधाने करीत असतात.

भौतिक शास्त्रज्ञांनी ध्वनितरंगांचा अभ्यास केला असून निसर्गसिद्ध श्राव्याची अनुकृति करण्याचीं यंत्रेंहि निर्माण केलीं आहेत. श्राव्य ऐकण्याचें इंद्रिय श्रोत्र तसें श्राव्य उत्पन्न करण्याचें इंद्रिय वक्त्र किंवा वदन हें आहे. दृश्य पाहण्याचें इंद्रिय नेत्र आहे. पण दृश्य प्रकाश उत्पन्न करण्याचें इंद्रिय मात्र आपणास नाही. दृश्य उत्पन्न करण्याकरतां आपल्याला त्याची प्रतिकृतीच करावी लागते. मूर्त दृश्याचा संक्षेप म्हणून आपण पटदृश्य पतकरतों. तसें करीत असतांना मूर्त विशिष्ट गुणांची उणीव आपण कल्पनेने भरून काढतों. म्हणून चित्रपटांचें आकलन होण्यास थोडेंबहुत शिक्षण व्हावें लागतें. लहान मुलांना नाट्याचें आकलन होतें तसें बोलपटाचें होत नाही. पटचित्रात मूर्तीची प्रचीति येण्यास कांही काळ शिक्षण व्हावें लागतें. श्राव्य उत्पन्न करण्यास मूळचें वक्त्र किंवा वाद्य याच्या आकार-आकृतींचें अनुकरण करण्याची गरज नसते. त्याखेरीज अन्य साधनांनी श्राव्य तरंग हवेंत उत्पन्न करतां येतात. आधुनिक बोलपटामध्ये दृश्याचें अनुकरण वर्ण, आकार, आकृति, एवढ्यापुरतेंच पडद्यावर करतात. तसेंच श्राव्याचेंहि अनुकरण सुरांपुरतेंच करतात. असें करतांना वक्त्यांचें अनुकरण पूर्णपणें साधतें असें नाही. व्यक्तिविशेषांत किंचित् वैगुण्य राहतें तिकडे आपण दुर्लक्ष करतों. एकाचें श्राव्य आणि दुसऱ्याचें दृश्य अशी सांगड सुद्धा घालतां येते. रेडा वेद म्हणतांना पडद्यावर दिसतो तेव्हां तो पडदा रेड्याचें दृश्य आणि वेदघोष करणाऱ्या माणसाचे बोल एकत्र उमटवीत असतो. ज्याला दृश्य आणि श्राव्य यांतील रहस्य नेमकें माहीत आहे तोच हें कौशल्य प्रकट करूं शकतो, हें उघड आहे.

---

**मराठी नाट्यप्रवेश भाग १ ला**—[संपा०– वि. द. साठे, प्राप्तिस्थळः. आदर्शमुद्रणालय, ३९५।५ सदाशिव, पुणें, २ मूल्य १॥ रु. ]

वर्तवणी करण्याची बुद्धि मनुष्यांत उपजतच असल्यामुळे, शिक्षणदानांत त्या बुद्धीचा उपयोग करून घेणें फायदेशीर होते, ह्या धोरणाने गेल्या शंभर वर्षांतील मराठी नाट्यवाङ्मयांतील निवडक प्रवेशांचा खास विद्यार्थ्यांना उपयुक्त असा संग्रह करण्याचा श्री. साठे यांनी संकल्प केला असून, त्यास अनुसरून हा पहिला भाग प्रसिद्ध केला आहे. ह्या उपक्रमाची महती प्रस्थापित करणारी विस्तृत प्रस्तावना आणि प्रवेशास अनुलक्षून नेपथ्य, अभिनय, नाटककार, ह्यासंबंधी अभ्यासोपयोगी माहिती ह्यांची जोडहि देण्याची दक्षता संपादकांनी ठेविली आहे.

# सदेह स्वर्ग

लेखक— प्रा. रामचंद्र महादेव मराठे, एम्. ए.

आम्ही तुकाराम बोलपट पाहून परत आलों होतों. माझा चिकित्सक मित्र वामन आराम खुर्चीवर बसून धुराचे फवारे वर सोडीत होता. एकदम तो म्हणाला ' आपण तुकारामाला स्वर्गांत रवाना करून आलों. पण पुढे काय झालं याची तुला कांही कल्पना आहे का ? '

' म्हणजे ? ' मीं आश्चर्यानें विचारलें.

' तुकारामाचें उत्तरचरित्र कसें गेलें असेल याचा तूं कधीं विचार केला आहेस का ?' त्याच्या म्हणण्याचा रोख मला न समजल्यामुळे मी मुग्धच राहिलों.

' तूं कशाला करशील विचार ? पण मी समजावून देतों बघ एक दोन उदाहरणांनी.

एकदा असं झालं स्वर्गांत, ज्ञानदेवांचं प्रवचन ठरलं होतं. एकनाथ, नामदेव, चांगदेव— अर्थात आत्मस्वरूपांत—एकत्र जमून प्रवचनाला निघाले होते. बरोबर मुक्ताबाई पण होत्या. वाटेंत त्यांना तुकाराम भेटले. बोवांच्या हातांत एक भरलेला लोटा होता.

' का, बोवा, चलतां की नाही ज्ञानदेवांच्या प्रवचनाला ? ' नामदेवांनी विचारलें.

' छे छे मी कसला येतों ! हा देह घेऊन आलों ना स्वर्गांत. आतां देहधर्म पाळला पाहिजे.' बोवा आपल्या वाटेने गेले.

' किती अमंगळ दिसतात हो बोवा ! काय त्यांचं तें दाढीमिशांचं जंगल—त्यांत उवा ही दिसल्या थोड्या. ' मुक्ताबाई उद्गारल्या.

' ज्याचे अंगीं मोठेपण तया यातना कठीण ' एकनाथांनी समारोप केला.

कां कसा आहे तुकारामाच्या उत्तरचरितांतला प्रसंग ? सजवतां येईल की नाही एखादा बोलपट ? '

विदेही आत्मा प्रवचन कसें देणार ? आणि स्वर्गाच्या शुद्ध वातावरणांत उवा कशा उद्भवूं शकतील ? असे उलट प्रश्न विचारून वामनला अडवावें असें मला क्षणभर वाटलें. पण तो मुद्दा गौण होता. सदेह स्वर्गाला जाण्यांत कांही विशेष मोठेपणा आहे हा लोकभ्रम त्याने किती मर्मभेदक शब्दांनी विदारून टाकला होता.

' जडदेह कसा घेउनि गेला तुकाराम वाणी ' ही ओळ भजन मंडळीच्या तोंडून ऐकतांना माझें हृदय सुद्धा आदरातिशयाने भरून येत असे. आणि समाधि घेऊन परलोक गाठणाऱ्या ज्ञानदेवासारख्या संतापेक्षा खास विमानांतून सदेह स्वर्गाला जाणाऱ्या तुका-रामाची योग्यता निःसंशय श्रेष्ठ अशी माझी दृढ श्रद्धा होती. वामनाच्या वाक्प्रहारांनी ती डळमळूं लागली. आणि तुकारामबोवांवर सदेह स्वर्गारोहणाचा हा सोहळा लादण्यांत त्यांचें हसें करण्याचा तर हेतु नसेल ना, अशी शंका मनाला चाटून गेली.

पण भोळ्या भजनी संप्रदायाबद्दल अशी शंका घेणें अन्यायाचें होईल. संतांची कुचेष्टा करण्याइतकी चिकित्सक बुद्धि अथवा बौद्धिक अहंकार त्यांच्यांत सापडणार नाही. त्यांच्या भाबड्या मनाला इहलोक व परलोक यांत फक्त स्थलभेदच प्रतीत होतो. आपल्या सर्व आवडी व गरजा जशा मृत्युपूर्वी असतात तशाच मरणोत्तर कायम राहतात असेंच त्यांना

वाटतें. प्राचीन मिसरमधील लोक मृताच्या कबरस्थानांत त्यांच्या आहारविहाराची सर्व तरतूद करून ठेवीत असत. आणि अरबी भार्षेतील सुरस गोष्टींत वडलांसाठीं स्वर्गांत न्हाव्याची रवानगी करणाऱ्या सुलतानाची कथा आपण वाचतों. या व अशाच स्वरूपाच्या इतर लोककथांवरून स्वर्ग म्हणजे पृथ्वीसारखीच पण पृथ्वींतील शल्यें नसलेली उपभोगभूमि होय असाच सर्वसाधारण ग्रह दिसून येतो.

आणि हें स्वाभाविकच आहे. सामान्य माणूस देहभरणाच्या वेटोळ्यांतून कधी बाहेरच पडत नाहीं. ' मुख सुरकुतलें, मस्तक पिकलें, शरीर रोगानें पोखरिलें ' तरी भोगेच्छा आपणांला कवटाळून धरते. जन्मापासून मरणापर्यंत देहभरण, देहभूषण व देहलालन हाच ज्यांचा एकमेव व्यवसाय असतो त्यांना स्वर्गांतसुद्धा देह सोडावासा कसें वाटेल ? पृथ्वीवर जे जनानखाने उभारतात त्यांना स्वर्ग म्हणजे परिस्तान असें वाटावें यांत नवल काय ?

त्यांतून तुकारामबोवांनी ' नलगे मुक्ति ' आणि ' गर्भवासी सुखें घालावें आम्हांसी ' अशी देहाविषयी आसक्ति वारंवार आग्रहपूर्वक व्यक्त केली होती. तेव्हा मरणजननाचे फेरे वाचवून त्यांना सदेह स्वर्गाला पाठविण्यांत भोळया भाविकांना भक्तसिद्धीचा विक्रम वाटावा हें स्वाभाविकच होय. पण या स्वर्गारोहणाच्या कल्पित कथेवरून बोवांच्या योग्यतेला धक्का न पोचतां त्यांच्या चाहत्यांची वैचारिक दुर्बलता मात्र उघडी पडते. इंग्रज कवि रूपर्ट ब्रूकने एका कवितेंत माशांची स्वर्गकल्पना चितारतांना मऊ चिखल आणि न आटणारें पाणी यांनी भरलेला जलाशय म्हणजेच स्वर्ग, असें मार्मिक वर्णन केलें आहे. दुसऱ्या एका लेखकाने मध्यमवर्गीयांच्या स्वर्गाचें चित्र रंगवितांना चिमुकले बंगले, चिमुकल्या बागा, कधी गैरहजर न राहणारे व कधी तक्रार न करणारे आदबशीर नोकर यांना प्राधान्य दिलें आहे. खरोखर, जगांतील निरनिराळया लोकांच्या स्वर्गकल्पनांवरून त्यांची मानासिक उंची मोजण्यास हरकत नाही.

किंबहुना स्वर्गाचा हव्यास हाच आमच्या दुर्दम देहबुद्धिचा निर्विवाद पुरावा आहे. शरीराहून भिन्न असा शरीरी आत्मा जरी आम्हीं कल्पिला, ' अच्छेद्योऽयमदाह्योयम् ' असें जरी त्याचें नकारात्मक वर्णन केलें, आणि त्याने आत्मरूप ओळखून त्यांत तन्मय होण्यांतच जरी जीवनाची सार्थकता मानली, तरीहि आमच्या रूपरत कवींना त्यांत समाधान न वाटून त्यांनी शून्यांत वसाहती वसविल्या आणि पुराणिकांनी त्या कोट्यवधि गणसंख्येने भरून तेथे अप्सरांचे ताफे नाचविले. विचारवंतांची जिथे ही गत तिथे सामान्य टाळ कुटणारांनी तुकारामबोवांना गरुडपंखावर बसवून वैकुंठांत रवाना केलें यांत आश्चर्य नाही.

अडाणी व अंधश्रद्ध बहुजनसमाज आपल्या श्रद्धा व आकांक्षा आराध्यदेवतेवर लादतो. देवाला जागें करणें आणि निजवणें, त्यांच्या अंगावर दागिने चढाविणें, त्याला पंच पक्वान्नांचें जेवण घालणें हा सर्व या आत्मौपम्य बुद्धीचा विलास आहे. इतक्यांवरच समाधान न होऊन आम्हीं आपली लोभबुद्धि ही परमेश्वरावर लादली. पास होण्यासाठीं पेढे, संकट निवारणासाठीं सत्यनारायण, पुत्रप्राप्तीसाठी चांदीची समई असे भावहि आम्ही ठरवून टाकले. आणि देवाच्या दरबारांत हा लाचलुचपतीचा व्यवहार दिवसाढवळ्या राजरोस अधःपातविरोधी नगररक्षकदलापासून निर्भय असा सर्रास चालूच आहे.

संतांच्या चमत्काराचें मूळ सुद्धां भोळ्याभाबड्या जनतेच्या मनोवृत्तींतच सांपडतें. सामान्याहून कांहीतरी वेगळें असल्याशिवाय, आणि तें वेगळेपण सुद्धा अगदी डोळ्यांत भरण्यासारखें असल्याशिवाय संतपण लोकांना पटतच नाहीं. म्हणूनच भोंदू लोक जटा वाढ-

वून, भगवे लेऊन, टिळेमाळा चढवून व मठाची उठाठेव करून फसवितात व लुबाडतात. खऱ्या संतांना या बाह्यचिन्हांची गरज कधींच भासत नाही. एकनाथांनी आपली साम्यबुद्धि ब्राह्मणांआधी अस्पृश्यांना जेवण घालून दाखविली. तुकाराम महाराजांनी सामान्यांत सामान्याप्रमाणे राहून अपरिग्रहाचें कठीण व्रत आचरलें. 'तुम्हापाशीं आम्हां येऊनिया काय वृथा आहे शीण चालण्याचा,' असा शिवाजीसारख्या राजाला निरोप पाठविला. स्वतःला मारणाऱ्या मंबाजीचें अंगसंवाहन करून अक्रोध आणि स्थितप्रज्ञता प्रगट केली. जन्मभर कुचेष्टा व विटंबन सहन करून 'आतांतरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा' असा सतत टाहो फोडून मनुष्यमात्राला अधोगतीकडून आत्मोन्नतीकडे नेण्यासाठी वाणी झिजवली. आपपर भाव उरला नसून सुद्धा

'येतो हिताचा कळवळा पडतीं हातीं म्हूण काळा'

अशा तळमळीने

निंदावें हें जग, ऐसा भागा आला भाग.

अशा कर्तव्यबुद्धीने निर्भयपणें लोकनिंदेचें अप्रिय कार्य सॉक्रेटिसप्रमाणे अखंड चालविलें.

लोकोद्धारार्थ लोकांमध्ये राहूनहि त्यांची आत्मशांति कधी ढळली नाही. 'जेथें तेथें देखें तुझीच पावलें त्रिभुवन संचलें विठ्ठला गा' असा स्थिरचरांत दिव्यत्वाचा साक्षात्कार त्यांना होत होता. 'वृक्षवल्ली आम्हां सोयरे वनचरे' असें विशाल विश्वबंधुत्व मनांत भरून 'रमे तेथें मन क्रीडा करी' अशी सुखसिद्धि त्यांनी अवगत केली होती. तुकाराम महाराजांना स्वर्गाचा पाड काय होता ? आपल्या पुण्याईने त्यांनी इहलोकींच स्वर्ग उभा केला होता. आणि त्यांच्या सन्निध किंवा आसपास वावरण्याचें भाग्य ज्यांना लाभलें होतें त्यांना जर देखणे डोळे असते तर याचि देही याचि डोळां भूवरील स्वर्गाचें हें अलौकिक दृश्य दिसलें असतें. पण तुकाराम महाराजांच्या हयातींत त्यांचा उपहास करून त्यांच्या अवसानानंतर ते टाळकुटींत गात राहिले, 'जड देह कसा घेऊन गेला तुकाराम वाणी !'

जड देह घेऊन स्वर्गारोहण करण्याच्या चमत्कारापेक्षां जडदेहावर मात करून आत्मबलाचा उत्कर्ष साधण्याचा चमत्कार जास्त अलौकिक व तुकाराम महाराजाचें मोठेंपण जास्त उठवून दाखविणारा आहे. इंद्रायणींतील अभंगाच्या वह्या तरण्याचा चमत्कारसुद्धा त्यांचे असामान्यत्व सिद्ध करण्यास बिलकुल आवश्यक नाही. कागद हा बोलून चालून हलका असल्यामुळे पाण्यावर सहज तरंगू शकेल परंतु तुकारामाच्या निर्याणापासून आज तीन शतकें लोटलीं असून सुद्धा त्यांच्या अभंगांचें महत्त्व आमच्या वाङ्मयांत अथवा सामाजिक जीवनांत कमी न होतां सतत वाढत आहे यांतच त्यांच्या मोठेपणाचें बीज आहे. त्यांच्यासारख्या प्रबुद्ध व्यक्तींना आत्महिताचें सांकडे कधीच पडत नाही. 'अग्निकापुराच्या मेळीं काय उरली काजळी' असें त्यांचें निर्विकल्प जीवन असतें. पण इतर कसे तरतील ही तळमळ त्यांना स्वस्थ बसूं देत नाही. तुकाराम महाराजांनी सुद्धा अज्ञांचा बुद्धिभेद होऊं न देतां आत्मशुद्धीचें साधन सुलभ करण्यांत देह चंदनाप्रमाणे झिजविला. त्यांच्या सारखी विभूति शतकांत एखादीच जन्मास येते. पण त्या एकाच विभूतीच्या कर्तृत्वविलासामुळे मानवी जीवनाची पातळी वर चढून समाज ध्येयस्वर्गाच्या थोडा सन्निध सरकतो.

---

# ज्ञानेश्वरीच्या चार पाठ-परंपरा

लेखक—
कै. गोविंद कृष्ण मोडक

## पूर्वार्ध

**प्रस्तावना**—श्री. हर्षे यांनी अलीकडे ज्ञानेश्वरीची प्रत संपादिली आहे. पूर्वीच्या प्रती पाहतां, ही प्रत केवळ अभिनव आहे. हिच्यामध्ये संपादकांचा अत्यंत साक्षेप दिसून येतो. तिसांहून अधिक पाठांची परस्परांशीं विशद तुलना या प्रतींत केलेली आहे. शिवाय प्रथमाध्यायगत सर्व शब्दांची सूचीहि दिलेली आहे. यामुळे चिकित्सक अभ्यासकास या प्रतीने विशेष साह्य होतें: असें भरपूर साह्य मलाहि या पुस्तकाने मिळालें; व यामुळेच प्रस्तुत लेख लिहिण्यास मला विशेष सोय लाभली. हा लेख मुख्यतः या प्रतींतीलच माहिती-वर आधारलेला आहे. याबद्दल मी श्री. हर्षे यांचे मनःपूर्वक आभार मानतों. प्रस्तुत लेखांत श्री. हर्षे यांचें मत मीं बऱ्याच ठिकाणीं खोडिलें आहे. यास आधार मला त्यांच्यांच प्रस्तुत कृतींत मिळाले. यावरून माझा हा लेख म्हणजे एक प्रकारें 'गंगापूजन गांगें' या प्रकारचा झाला आहे. श्री. हर्षे काय, मी काय, वा इतरहि मराठीचे अभ्यासक काय,—हे सर्वच आपली मातृभाषा मराठी हिचे सेवक असल्यामुळे एककार्य आहेत. यामुळे परस्परांचे कृतींतील गुणदोष दाखविण्यांत केवळ मातृभाषासेवा हाच उद्देश असल्याने परस्परांशीं खेळीमेळीनेच वागणें योग्य आहे. अशीच मनाची प्रवृत्ति ठेवून मी पुढील ओळी लिहीत आहें. त्यांचा स्वीकार श्री. हर्षेहि त्याच प्रवृत्तीने करितील, अशी मी आशा बाळगतों.

आपण संपादिलेली सिद्धनाथ-प्रत ही 'मूळ ज्ञानेश्वरीचें प्रायः यथार्थवत् रूपान्तर' आहे, असें श्री. हर्षे प्रतिपादूं इच्छितात. हें साध्य होण्यास दोन गोष्टी अवश्य आहेत. त्या म्हणजे या प्रतीचें मुळाशीं (१) कालतः आणि (२) भाषारूपतः सामीप्य असणें. पैकी (१) श्री. हर्षे यांनी प्रतीचा लेखनकाल आपल्या मतें शक १२७२ हा ठरविला आहे. पण तो गणितांच्या प्रमाणांपुढे मुळीच टिकत नाही. यामुळे एक सामीप्य लटपटलें. (२) दुसरेंहि केवळ काल्पित आहे, व तेंहि लटपटणार, असें याच लेखांतील प्रतिपादनाच्या ओघांत दिसून येईल. अर्थात् हीं दोन्ही सामीप्यें बाधित झाल्याने ही हर्षे-प्रत अभ्यासकांस विशेष उपयुक्त नाही, हें ओघानेच प्राप्त होतें. असो. ज्ञानेश्वरी-पोथीच्या लेखीं परंपरा ठरवितांना त्यांत सहजच श्री. हर्षे यांच्या प्रतीचेंहि स्थान निश्चित होईल. तदनुसारच तिचें मूल्य मापावें, असें मी अभ्यासकांस सुचवितों. इतक्या प्रस्तावानंतर आता या परंपरा कोणत्या सांपडतात, हें पाहूं.

अनुक्रमणिका

## १. परंपरांचा वंशवृक्ष

मूल-ज्ञानेश्वरी (=ज्ञाननाथी)
शक १२१२




**वंशवृक्षाची फोड**— (१) मूल-ज्ञानेश्वरीवरून झालेल्या अनेक प्रतिकृति लोकांत होत्या. या सांप्रत प्रायः मूलपोथीसह नष्ट झाल्या असाव्या. यांसच आपण येथे **अनेक पोथ्या** म्हटलें आहे. यांची परंपरा **ज्ञाननाथी** होय. (२) एकनाथांनी स्वकालीं प्रचारांत असलेल्या पोथ्या संशोधून एक शुद्ध प्रत तयार केली. ही **एकनाथी** होय. (३) सिद्धनाथाने स्वहस्तें मूल-ज्ञानेश्वरीची एकीवरून दुसरी,-अशा अविच्छिन्न परंपरेने सिद्ध झालेली अशी नकल गुरूपासून मिळवून, तींत सुबोधतेसाठी बऱ्याच सुधारणा करून स्वतां एक प्रतिकृति लिहून काढिली. हिला वर **सिद्धनाथी** म्हटलें आहे. (४) एकनाथी व सिद्धनाथी यांतील संशोधन अर्थास उपकारक असलें तरी ज्ञानेश्वरीच्या यथामूल रूपास सोडून असल्याने गोपालाश्रमाने विश्वनाथ-नगरी काशी येथे मूळ प्रतीचें रूप प्रतिष्ठापित करणारी अशी प्रत, उपलब्ध प्रतींतून तर्काने हेरलेले मूळपाठ घालून, सिद्ध केली. हिला आपण **विश्वनाथी** म्हटलें आहे. एकनाथी इत्यादि तीन आदर्श प्रतींवरुन नकललेल्या पोथ्या तं-१ इत्यादि संज्ञांनी वर सांगितल्या आहेत. या सर्व संज्ञा श्री. हर्षे-संपादित आवृत्तींतून घेतल्या आहेत. अर्थात् या संज्ञांनी उल्लिखित पोथी व तद्विषयक माहिती हर्षे-प्रतींत पहावयास मिळेल.

### २. परंपरा-निश्चयार्थ उपयुक्त ओव्या—

१ शके बाराशतें बारोत्तरें। तैं टीका केली ज्ञानेश्वरें॥
सच्चिदानंदबाबा आदरें। लेखकु जाला॥ १८०२.

२ एणेंचि गुरु-संप्रदायें अनुगृहीतु। परशुराम-सिद्धनाथ-सुतु।
सिद्धनाथ स्वयें हस्तु। गीताग्रंथु लिखिते॥ १८०३.

३ श्रीएकनाथ स्वामी समर्थ। त्यांच्या शिष्याच्या रंकाचें रंक॥
विप्र-मल्हाळु तेणें हा ग्रंथ। लिहिला॥ १८०४ (पृ. २७).

४ शकें पंधराशतें सावोत्तरि। तारण नाम संवत्सरि।
येका जनार्दनें अत्यादरि। गिता टीका ज्ञानेश्वरि। प्रति शुध्ध केलि॥

५ ग्रंथु पुर्विंच अति शुध। परि पाठांतरें शुध अबध्द।
तो शोधुनियां एवंविध। प्रति शुध्द। सिध ज्ञानेश्वरि॥ (पृ. १४)

६ शके सोळाशे बत्तीस वरि । शार्वरीनाम संवत्सरीं ॥
गोपाळाश्रमें अत्यादरीं । प्रति ज्ञानेश्वरी । शुद्ध केली ॥
७ ग्रंथ आधीच बहु चांगला । परि लिहिणारिं भिन्न केला ॥
तो प्रति मेळउनि शोधिला । पाठ घातला । पूर्वीचा ॥ ( पृ. २० ).

**विशिष्ट शब्दांचे अर्थ— एणेंचि गुरुसंप्रदायें अनुगृहीतु** = याच ( ज्ञानेश्वर–सच्चिदानंदबाबा इ० ) गुरुपरंपरेंतील तत्कालीन गुरूने शिष्य म्हणून स्वीकारिलेला. **रंकाचें रंक**= अत्यंत रंक, क्षुद्रतम व्यक्ति. **प्रति**=पोथी, ग्रंथ. येथे 'प्रतिशुद्ध' असा समास विवक्षित नाही. **परि**-चा अर्थ येथे कांहीच नाही; तें केवळ पादपूरणार्थ आलें आहे. तुल्य–प्रकार–मान्याचेनि नांवें । ईश्वराहि **परि** न लवे ॥ (१८–६६८) या ओवींत **परि** अर्थशून्य आहे. **अबद्ध**=विसंगत, रूपांत मेळ नसल्याने दुर्बोध. **शोधुनियां**=समजावयास सोपें, अर्थात् सद्यःकालीन रूप ठेवून व इतर रूपें गाळून. **प्रति ज्ञानेश्वरी** =ज्ञानेश्वरीची प्रत. **शोधिला**=नकलकारांनी मुळास सोडून घातलेले पाठ काढून टाकून सच्चिदानंदबाबांनी लिहिलेले मूळचे पाठ घालून शुद्ध केला.

**अन्वय–ओवी १**—शके बारोत्तरें बाराशतें, तैं ज्ञानेश्वरें टीका केली.
सच्चिदानंदबाबा आदरें लेखकु जाला.

**ओवी २**— एणेंचि गुरु-संप्रदायें अनुगृहीतु परशुराम–सिद्धनाथ–सुतु
सिद्धनाथ, गीताग्रंथु स्वयें हस्तु लिखिते.

**ओवी ३**—समर्थ श्रीएकनाथ स्वामी त्यांच्या शिष्याच्या रंकाचें रंक
विप्र-बल्लाळ, तेणें हा ग्रंथ लिहिला.

**ओवी ४**—शकें सावोत्तरि पंधराशतें, तारण नाम संवत्सरि,
येका जनार्दनें गिता टीका ज्ञानेश्वरि प्रति अत्यादरि शुध केलि.

**ओवी ५**—ग्रथु पुर्विच अति शुध, परि ( पुढे ) पाठांतरें शुध
( असलेला ) अबद्ध ( झाला ), तो शोधुनियां, एवंविध
शुद्द ज्ञानेश्वरि प्रति सिध (केली).

**ओवी ६**—शकें सोळाशे वरि बत्तीस, शार्वरीनाम संवत्सरीं,
गोपाळाश्रमें ज्ञानेश्वरी प्रति अत्यादरिं शुद्ध केली.

**ओवी ७**—ग्रंथ आधीच बहु चांगला, परि ( पुढे तो ) लिहिणारिं
भिन्न केला, ( म्यां ) प्रति मेळउनि तो शोधिला, ( त्यांत )
पूर्वीचा पाठ घातला.

**ओव्यांचा सामान्य अर्थ—ओवी १** ( ज्ञानेश्वरीची उपपत्ति सांगणारी ) शक १२१२–मध्ये ज्ञानेश्वरांनी भगवद्गीतेवर टीका केली. ती ( त्यांनी तोंडीं सांगितलेली ) टीका सच्चिदानंदबाबांनी मोठ्या आदराने लिहिली. **ओवी २** ( सिद्धनाथाचें धोरण सुचविणारी ) याच गुरुपरंपरेंतील ( तत्कालीं पीठाधिष्ठित असलेल्या ) गुरूनें शिष्य म्हणून स्वीकारिलेला, परशुराम–सिद्धनाथ याचा पुत्र सिद्धनाथ हा ज्ञानेश्वरी स्वतः लिहिता झाला. **ओवी ३** ( सिद्धनाथीचा आदर सुचविणारी ) समर्थ श्रीएकनाथ महाराज यांच्या शिष्याचा अतिक्षुद्र असा शिष्य जो मी विप्रबल्लाळ त्याने हा ग्रंथ लिहिला. **ओव्या ४, ५** (एकनाथी धोरण सांगणाऱ्या)

शक १५०६, तारण संवत्सर, या वर्षी एकनाथाने ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करून लिहिली. हा ज्ञानेश्वरी ग्रंथ पूर्वीच अत्यंत शुद्ध होता. (पुढे) त्याच्या प्रतिकृति होतांना पाठभेद झाल्याने, **शुद्ध** असलेला हा ग्रंथ **अबद्ध** म्हणजे विसंगत, दुर्बोध झाला. त्यांतील प्रामादिक पाठ टाकून व योग्य (=स्वकालीन) पाठ ठेवून, ही ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध बनविली आहे. **ओव्या ६,७**–(गोपालाश्रमाचें धोरण सांगणाऱ्या) शक १६३२, शार्वरी संवत्सर, या वर्षी गोपालाश्रमस्वामीने मोठ्या भक्तीने ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करून लिहिली. ग्रंथ मुळांतच फार चांगला सुबोध होता. पुढे लेखकांनी तो विसंगत, दुर्बोध केला. म्यां त्याच्या प्रती मिळवून, मूळचे पाठ ठेवून, तो शुद्ध, सुबोध केला. ज्ञानेश्वरीच्या शोधनांत एकनाथांनी पूर्वपाठ न ठेवितां 'स्वकालीन पाठ ठेविला' हा अर्थ 'शोधूनियां' याचा कसा होतो ?

**३. शोधणें–चा द्विविध अर्थ**—आपापली प्रत सिद्ध करितांना एकनाथ व गोपालाश्रमस्वामी आपापलीं धोरणें पुढीलप्रमाणे क्रमाने सांगतातः—

**एकनाथ**— अतिशुद्ध (पुढे) पाठांतरीं शुद्ध अबद्ध ग्रंथ **शोधिला**।

**गोपालाश्रमस्वामी**—चांगला, (पण) लिहिणारीं भिन्न केला, (असा) ग्रंथ **शोधिला**, (त्यांत) पूर्वीचा पाठ घातला.

येथे दोघेहि आपण केलेल्या बदलाचें वर्णन '**शोधिला**' याच शब्दाने करितात. त्यांत गो. **शोधिला**–ची फोड 'पाठ घातला पूर्वीचा' या शब्दांनी करतात. येथे प्रश्न--'**शोधणें**' म्हणजे 'पूर्वीचा, मूळ पाठ घालणें' हा अर्थ उघड असतां, तोच अर्थ 'पाठ घातला पूर्वीचा' या शब्दांनी पुन्हा किमर्थ सांगितला ?

याच्या उत्तरासाठी एक उदाहरण घेऊं. 'सणाचे दिवशीं आपण भोजनार्थ पानें म्हणून **पानें** घेतों. (एरवी ताटें घेतों.)' या वाक्यांत दुसरा **पानें** हा शब्द कशासाठी ? 'भोजनार्थ पानें घेतों' एवढ्याने विवक्षित अर्थाचा पुरा बोध होतो. उत्तर–मान्य. अशा रीतीने हा शब्द विवक्षेस अनुपयुक्त आहे. प्रश्न–मग आपण कां योजितों ? उत्तर– अर्थात् अन्य कांही गोष्ट त्याने **सूचनीय** असली पाहिजे. ती ही की, 'एरवी पानें म्हणून आपण **ताटें** घेतों. पानें-चा हा 'ताटें' अर्थ येथे घ्यावयाचा नाही.' या साम्याने प्रस्तुताकडे पाहतां प्राप्त होतें की, 'पूर्वीचा पाठ घातला' याहून अन्य अर्थाने शोधणें-चा प्रयोग पूर्वी करण्यांत आला आहे. अर्थात् हा प्रयोग म्हणजे एकनाथीय. यावरून **शोधणें**-चा अर्थ एकनाथांनी 'पूर्वपाठ-स्वीकार' याहून भिन्न घेतला असला पाहिजे. तो म्हणजे '**पूर्वीचा** पाठ नव्हे, तर **स्वकालीन्** सुबोधकर पाठ घालणें'. गोपालाश्रमास, आपला अर्थ 'एकनाथभिन्न' आहे हें स्पष्ट करण्यासाठीच, पुनरुक्ततादोष पतकरूनहि 'पाठ घातला पूर्वीचा' असे शब्द योजणें भाग पडलें. ही स्थिति लक्ष्यांत घेऊन, **शोधणें**-चा अर्थ एकनाथी ओवींत 'सोपा, स्वकालीन पाठ घालणें' असाच प्राप्त होतो, ही गोष्ट विद्वानांस पटेल, अशी आशा करितों.

आता वर घोषित वा सूचित केलेल्या ज्ञानेश्वरी-प्रतिकृतींच्या तीन धोरणांचा विचार करूं.

**४. एकनाथी धोरण**—एकनाथांच्या पूर्वी ज्ञानेश्वरीच्या नकला लोकांच्या वाचनांत होत्या. त्यांत कालाच्या ओघानुसार भिन्नभिन्न शब्दरूपें घुसलीं होतीं. जुन्या ग्रंथाची नकल करितांना लेखकाचे हातून जुन्या रूपाच्या ठिकाणीं वारंवार सहजच स्वकालीन रूप घातलें जातें. या प्रवृत्तीने शके १२१२ ते १५०६ या तीन शतकांच्या अवधींत ज्ञानेश्वरींत तत्तत्कालीन

भिन्नभिन्न रूपें घुसलीं होतीं. अशा रूपांपैकी स्वकालीन रूप तेवढें ठेवून, इतर सर्व एकनाथांनी गाळिलीं, असें दिसतें. स्वकालीन रूपच कां ठेविलें ? उत्तर-रूपभेदामुळे ग्रंथ दुर्बोध झाला होता. अर्थात् तो वाचकांस **सुबोध करणें** हें एकनाथांचें ध्येय. ही सुबोधता येण्यास स्वकालीन रूपच उपयुक्ततम. म्हणून एकनाथांनी ( **'शोधूनियां'** म्हणजे ) **जुनीं रूपें काढून टाकून** स्वकालीन रूपें ज्ञानेश्वरींत घातलीं. याने, त्यांच्या इच्छेनुसार ग्रंथास जरी सुबोधता आली असली तरी ही त्यांची प्रत भाषादृष्ट्या मूळ ज्ञानेश्वरीहून भिन्न झाली, हें उघड आहे. अर्थात् या त्यांच्या प्रतींत ज्ञानेश्वरकालीन रूपांचा संभव कमी असून, तिची भाषा प्रायः एकनाथकालीन बनलेली असणार. यामुळे मराठीचें अत्यंत जुनें रूप म्हणजे ज्ञानेश्वरीकालीन रूप अभ्यासूं इच्छिणारांस ही एकनाथी प्रत प्रायः अनुपयुक्तच होय.

५. **सिद्धनाथाचें घोषित व चरित धोरण**—हें धोरण ओवी २-मध्ये स्पष्ट सांगितलें नसलें तरी सूचित आहे. एकनाथांनी केलेल्या शुद्धीकरणाने जरी बऱ्याच भक्तांचें समाधान झालें असलें तरी असेहि दोन वर्ग विद्वानांत होते, ज्यांचा परितोष त्या शुद्धीकरणाने झाला नाही. पैकी एका वर्गाचें प्रतीक **सिद्धनाथ** व दुसऱ्याचें **गोपालाश्रमस्वामी**. एकनाथांनी भाषारूपांत बदल करून अर्थ सुबोध करण्याचा यत्न केला. हा भाषारूपभेद गोपालाश्रमास मुळीच रुचला नाही. उलट एकनाथांनी आणिलेली सुलभार्थता ही सिद्धनाथास अपुरी वाटली; व ती यावच्छक्य वाढविण्यासाठी त्याने पाठभेद केले. हें करितांना अर्थात तत्कालीन म्हणजे एकनाथीय रूपें त्याचे संस्करणांत शिरलींच, पण त्याने त्याहूनहि अधिक फेरबदल केले; शब्दहि मधून-मधून खुशाल बदलले. पण ' आपण आदर्श म्हणून एकनाथी प्रत न घेतां, मूळ ज्ञानेश्वरीचीच **अखंड परंपराप्राप्त यथामूल नक्कल** घेतली असल्याचा' त्याचा आग्रह आहे. म्हणजे त्याचें घोषित धोरण 'मी मूल-ज्ञानेश्वरीचीच प्रतिकृति आपणांपुढे ठेवीत आहें.' असें आहे. अर्थात् 'ती सर्वथा यथामूल आहे' असें त्याचें म्हणणें. पण हें घोषित धोरण वस्तुस्थितीशीं फारच विसंगत आहे. सि-प्रतींतील **रूपें** सिद्धनाथकालीन, व **शब्दहि** सुबोधार्थासाठी बदललेले, -- हीं दोन तर या प्रतीचीं वैशिष्ट्यें आहेत. म्हणजे त्यांचें चरित धोरण हें रूपांचें प्रचारानुरूप **अन्यथाकरण** आणि शब्दांचेंहि सुलभार्थतेसाठी **आधुनिकीकरण** असें ठरतें.

एकनाथीपेक्षा केव्हाहि मूल-ज्ञानेश्वरी-पाठ ग्राह्य असणार; अर्थात् तो पाठ सिद्धनाथाच्या प्रतिज्ञेप्रमाणे ज्ञानेश्वरीची यथामूल प्रत हस्तगत होऊन, मिळाल्यास कोणासहि इष्टच. याच पाठाच्या इष्टतेमुळे सि-चें स्वागत कांही विद्वानांकडून झालेंसें दिसतें. सि-च्या नकला करून घेणें हा याच स्वागताचा एक प्रकार होय. अशा नकला करितांना मात्र लेखकांनी, त्यांना जे पाठ केवळ सिद्धनाथाने स्वैर घातलेले वाटले ते घेतले नाहीत. तत्स्थानीं त्यांचे पठनांतील किंवा पूर्वपोथींतील पाठ त्यांनी ठेविले. यावरून उघड होतें की, सि-च्या घोषित धोरणाने ते प्रथम फसले, व तिच्या नकला करूं लागले. पण प्रत्यक्ष लिहितांना पदोपदीं आढळणारी तिची स्वैरता त्यांस रुचली नाही, व त्या-त्या ठिकाणीं त्यांनी सि-चे पाठ बहिष्कारिले. अशा रीतीने घोषित धोरणामुळे विद्वान् सि-च्या प्रती प्रथम आदरूं लागले, व तिच्या सामान्य लेखनशुद्धीमुळे तीविषयी त्यांचा आदरहि वाढला. पण पुढे तिच्या चरित धोरणामुळे, **स्वैर पाठभेदांमुळे** त्यांनी आपापल्या प्रतिकृति ठिकठिकाणीं या आदर्शाहून भिन्न राखिल्या, तेथें सि-हून भिन्न पाठ घेतले.

**६. गोपालाश्रमस्वामींचें धोरण** — एकनाथांनी उपलब्ध प्रतींतून आपल्या मतें ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत तयार केली. हींत त्यांनी रूपांची (अवद्धता=) **विसंगति** काढून टाकिली व तदर्थ एकविध अशींच रूपें ठेविलीं. ही एकविधता स्वकालीन रूपें ठेवून त्यांनी साधिली. यामुळे ज्ञानेश्वरींतील तत्कालीन जुनीं रूपें एकनाथ-प्रतींतून नष्ट झालीं. ही स्थिति कांही विद्वानांस रुचली नाही. कालाच्या ओघांत सामान्यतः सर्वांच्याच आवडीनिवडींत फरक पडतो. यामुळे जनमताचा लंबक पूर्वीच्या दिशेहून विरुद्ध दिशेला जाऊं लागतो. याच प्रवृत्तीने पंढरपुरास राहणारे गोपालाश्रमस्वामी यांस ' अर्थबोधासाठी शब्दरूपांत बदल,'— ज्ञानेश्वरकालीन रूपें काढून त्यांचे स्थानीं एकनाथकालीन रूपें ठेवणें हें धोरण,--पसंत पडलें नाही. त्यांनी त्यांस उपलब्ध झालेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रती घेऊन ( विश्वनाथपुरी ) काशी येथे गमन केलें; व तेथे बसून प्रतींची आपसांत तुलना, करून त्यांतील रूपांच्या अभ्यासाने जुनीं रूपें ठरवून या रूपांनी युक्त अशी म्हणजे ' यावच्छक्य यथामूल ज्ञानेश्वरीची प्रत ' करण्याचा प्रयत्न केला. एवंगुणविशिष्ट त्यांची प्रत शक १६३२-मध्ये सिद्ध झाली. या धोरणाचा खुलासा करणारी ओवी ७ आपण मागे दिलीच आहे. तींत हें धोरण ' पाठ घातला पूर्वींचा ' असें सांगितलें आहे. या प्रयत्नांत गोपालाश्रमस्वामींस कितपत यश मिळालें, याची फोड पुढे ' पाठभेद-तुलना ' या कोष्टकाच्या टीकेंत परिच्छेद १५-मध्ये दिसून येईल. तेथे आपण पाहूं की, एकनाथांनी ज्ञानेश्वर-प्रतींत सुबोधता व तदर्थ एकविधता साधण्यासाठी **स्वकालीन** रूपें घातलीं, तर गोपालाश्रमस्वामींनी तदर्थच साक्षात् ज्ञानेश्वरांनी सच्चिदानंदबाबांस लिहावयास तोंडीं सांगितलेलीं अर्थात् ज्ञानेश्वरकालीन रूपें, गोळा केलेल्या पोथींतून हेरून काढून घातलीं. थोडक्यांत म्हणणें तर— एकनाथी धोरण **सद्योरूपवादी** ( तत्कालीन रूपांचा पुरस्कार करणारें ), सिद्धनाथी धोरण **अर्थैकवादी** ( अर्थासाठी शब्दसुद्धा स्वैर बदलणारें ) आणि गोपालाश्रमस्वामींचें धोरण **यथामूलवादी** ( ज्ञानेश्वरीची शब्दशः व रूपशः प्रतिकृति करणारें सिद्ध होतें.

अशा रीतीने ज्ञानेश्वरीच्या प्रती करण्याच्या धोरणांत उलट-सुलट प्रवाह दिसून येतात. हे प्रवाह स्पष्ट जाणण्यासाठी पुढील कोष्टकांतील पाठ पारखूं.

**७. पाठनिवडीच्या धोरणांची तुलना— धोरणतुलनार्थ पाठ—**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | शक १५०६ | शक १५५१ | शक १५७२ | शक १६३२ |
| ओवी | **एकनाथ**कालीं संभाव्य पाठ | इ-प्रत | सि-प्रत | राजवाडे-प्रत |
| २५ | कृतकार्य-र्या-र्यो | कार्य | कार्य | का[illegible] |
| ४१ | नागर-रा-रां | नागरां | नानरिक | नागरां |
| १३४ | काचेयां-चयां-च्यां | काचयां | काचयां | काचेयां |
| १४० | तेया-तिया-तया-त्या | तया | तया | तेयां |

**ज्ञातव्य** — तं१ ही प्रत अत्यंत अशुद्ध असल्याने, ती एकनाथीस कालतः आसन्नतम असली तरी, येथे तत्स्थानीं इ ही प्रत प्रायः शुद्ध असल्याने, थोडी दूरची असतांहि, एकनाथीचा प्रातिनिधि म्हणून घेतली आहे.

**टीका**—(क) एकनाथ-स्वामींस मिळालेल्या पाठांतून पसंत केलेले पाठ इ-मध्ये 'कार्य इत्यादि रूपांनी प्रायः यथास्थित आहेत, असें आपण समजूं. हे पाठ (२५) रा-पाठांस विपुल

आणि वर्तमानकालांतील रूपांस प्रायः अभिमुख आहेत, असें दिसेल. याच पाठांचे ठिकाणीं (ख) लि-ने योजिलेले पाठ पाहतां ते (ओ० ४१) वर्तमानकालाशीं अधिकच जुळते दिसतात. याच्या उलट (ग) रा-कडे पाहतां ते पाठ ( म्हणजे गोपालाश्रमप्रयुक्त पाठ ) ताम्रपट, शिलालेख व महानुभावीय लेखन इत्यादि पुराणकालीन वाङ्मयांतील पाठांशीं तुल्य दिसतात (१३४, १४०). यावरून 'पाठ घातला पूर्वींचा' हें स्वामींचें धोरण स्पष्ट लक्षांत येईल. प्रसंगतः या धोरणाच्या तुलनेने (१) **एकनाथी** धोरण 'पाठ घातला आजिंचा' आणि (२) **सिद्धनाथी** धोरण 'पाठ घातला सुबोधकर' असें सांगतां येईल. एकनाथ, सिद्धनाथ व गोपालाश्रम यांनी वरील आपापल्या धोरणानुसार त्या-त्या काळीं ज्ञानेश्वरीची संहिता ठरविण्यांत केलेली कामगिरी आता पाहूं.

**८. एकनाथांचें कार्य**—एकनाथांपूर्वी सुमारें तीन शतकें ज्ञानेश्वरी लिहून सिद्ध होती. लोकांत तिचा अभ्यासहि चालू होता. अर्थात् तिच्या प्रतिकृति लोकांत पढल्या जात होत्या. मात्र या प्रतिकृति यथामूल नव्हत्या; प्रायः प्रत्येकींत मुळाहून कांही तरी बदल अवश्य होत असे. असा बदल कां व्हावा?

**९. मूळ व नक्कल यांतील अंतर**—प्रतिकृति लेखक प्रायः ज्ञानेश्वरीचा अभ्यासू असे. त्यास बऱ्याच ओव्या मुखोद्गत असत. त्याचे कंठगत पाठ कधी या, तर कधी त्या, अशा विविध पोथ्यांस अनुसरून असत. अर्थात् प्रतिकृति करण्यास घेतलल्या आदर्श-पोथीहून ते वारंवार भिन्न असत. तिची नक्कल करितांना मधून मधून तो तिचें अनुकरण प्रत्यक्षर, प्रतिचरण किंवा प्रति-ओवीहि करीत नसण्याचा संभव बराच असणार. लेखन करितांना वारंवार आपल्या कंठगत पाठाप्रमाणेच तो लिहीत जाणार. यामुळे कृति व प्रतिकृति यांत भेद उत्पन्न होई. तसेंच, जुन्या रूपांच्या ठिकाणीं त्याच्या हातून स्वकालीन रूपें नकळत पडत. आणखी, जुनी प्रत वाचतांना आकारसादृश्याने फसून एका वर्णाचे स्थानीं दुसरा वर्णहि क्वचित् वाचण्यांत येऊन लिहिला जावयाचा. या व इतरहि कारणांनी **नक्कल मुळाहून वरीच निराळी होत असे.** अशा विविध कारणांनी, पूर्वी लोटलेल्या तीन वर्षशतकांमध्ये झालेल्या ज्ञानेश्वरीच्या नकलांत विशेषतः तत्तत्कालीन रूपें शिरल्याने रूपांची विविधता म्हणजे खिचडी झाली होती. या खिचडीमुळे सहजच दुर्बोधता आली होती. मूळ व नक्कल यांत अशा रीतीने फरक पडणें प्रायः अटळ होतें. याची साक्ष श्री. हर्षे पुढीलप्रमाणे देतात. (१) पृ. ६२— 'या पोथ्या सिद्धनाथ-परशरामाच्या पोथीच्याच नकला आहेत असें प्रत्यक्ष उल्लेख नसता तर सिद्ध करणें अशक्य होतें, इतका त्यांमध्ये फरक आहे.' आणि (२) पृ. ६९—'मूळ व त्याच्या नकला यांत अत्यल्प साम्य आढळतें.' असो.

अशा रीतीनें नक्कल ही मुळाहून भिन्न असावयाचीच, ही गोष्ट सुतराम् निश्चित होते.

एतदनुसार तत्तत्कालीन परस्परभिन्न व म्हणून विसंगत अशा रूपांमुळे ज्ञानेश्वरीच्या नकला **अबद्ध** झाल्या. ही **अबद्धता** काढून टाकण्यासाठी एकनाथांनी एकविध रूपें ठेविलीं; मात्र, अर्थ सोपा व्हावा याकडे त्यांचें विशेष लक्ष्य असल्याने, त्यांनी स्वकालीन रूपेंच आदरिलीं. यावरून एकनाथांचें कार्य थोडक्यांत असें सांगतां येईल— 'ज्ञानेश्वरींत सद्यःकालीन रूपें घालून तिला सुबोधता आणणें.' या कार्याचा परिणाम पोथींतील भाषेवर होऊन तींत अनेक रूपें मूलभिन्न झालीं. ही गोष्ट वस्तुतः अनिष्ट होती. तरीपण याहि एकनाथी धोरणाचा पुरस्कार व उपबृंहण सिद्धनाथ या विद्वानानें केलें.

१०. सिद्धनाथाचें कार्य — शक १५०६-मध्ये एकनाथांनी ज्ञानेश्वरीचें यथावर्णित संस्करण केलें. तिच्या नकलाहि लोकांत होऊं लागल्या. नऊ वर्षांतच १५१५-मध्ये तं-१ अशी उल्लेखिलेली प्रत सिद्ध झाली. पुढे १५५१-मध्ये इ-प्रत तयार झाली. अशा रीतीने एकनाथी प्रतीचा प्रसार होत होता. परंतु मध्यंतरीं शक १५२१-मध्ये एकनाथ दिवंगत झाले; व त्यांच्याबरोबर त्यांनी केलेले फेरफार धारण करणारी त्यांची स्वतःची शुद्ध प्रतहि नष्ट झाली ( परिच्छेद १५ ), असें दिसतें. याच वेळीं 'रूपें आधुनिक करून सुबोधता आणणें' याहि धोरणाच्या पलीकडील धोरण अवलंबिलें पाहिजे, अशी प्रवृत्ति विद्वानांत उत्पन्न होऊं लागली. तेव्हा, अशी अधिक सुधारलेली प्रत ज्ञानेश्वरीचे कांही भक्त आकांक्षूं लागले. याच गोष्टीस पुढील कारणाने साह्य झालें.

एकनाथी मुळाची जवळच्या काळांतील नकल तं-१ ही अत्यंत अशुद्ध आहे. तिचा लेखक फारच निर्बुद्ध होता, असें दिसतें. या प्रतीच्या मानाने शक १५५१-मधील इ-प्रत पुष्कळच शुद्ध आहे. या दोन प्रती असतांहि, पहिली अत्यंत अशुद्ध व खासगी, आणि दुसरीहि सापेक्षतः शुद्ध असली तरी खासगीच असल्यामुळे, दोन्ही उपयोगास अयोग्य होत्या. यामुळे शुद्ध व शक्य तर एखाद्या मठाने पुरस्कृत, अशा प्रतीची मागणी लोकांत उत्पन्न झाली. ही मागणी कशी पुरी होणार ? वरील मागणी-नुसार परशुराम सिद्धनाथ याने लेखनतः पुष्कळ शुद्ध अशी एक प्रत सिद्ध केली. पण ही करितांना त्याचें समाधान नुसत्या रूपांत बदल केल्याने झालें नाही. त्याने शब्द, वाक्यरचना, अर्थव्यक्ति इ. गोष्टींतहि बदल केले.

११. पाठभेदांतील सि-च्या धोरणाचा आविष्कार — (१) सिद्धनाथाचें लेखन-शुद्धीकडे विशेष लक्ष होतें. यावरुन त्याचा साक्षेप दिसून येतो. याशीं (२) ओवी १७-मध्ये स-च्या स्थानीं श-ची प्रवृत्ति विसंगत आहे; पण ती त्याचे ठिकाणीं मधून-मधून आढळते खरी. ही प्रवृत्ति जन्मजात असावीसें वाटतें. हल्लीहि Selby चा उच्चार शेल्बि असा विद्वानांच्याहि तोंडीं आढळतो. सारांश-जन्मजात संस्कार सुटण्यास फार कठीण असतात. 'स्वभावो दुरतिक्रमः'. (३) अर्थाचा परिष्कार सि-मध्ये वारंवार आढळतो. याच प्रवृत्तीने ओवी ७२-मध्ये जागतां हा शब्द सि-ने अधिक घातला आहे. (४) स्वकालीन शब्दप्रयोग कळत वा नकळत लेखनांत शिरतात. 'नागरिक' ही प्रथमा अशीच सि-मध्ये आलेली दिसते. (५) सि-चा मुख्य कटाक्ष शीघ्र व असंदिग्ध अर्थबोधावर आहे. एतदर्थ इतर लेखकांनी दुर्बोध स्थानीं पूर्वीचे पाठ राखणें म्हणजे पूर्वसंधारण केलें असतां, याने शब्दांचीं रूपें व शब्दहि बदलिले आहेत. अशा रीतीने पाठ बदलण्यांत याची स्वैरिता दिसून येते. ( नागरां-सारखें ) जें रूप प्रचाराविरुद्ध, तें त्याने बदललें आहे. जो शब्द निरर्थक ( परिकर-९१ ), अज्ञेयार्थक (कांतले-१३८) किंवा संदिग्धार्थक (पिलावा-१६९) वाटला, तो काढून तत्स्थानीं अर्थवान् व निश्चितार्थक शब्द त्याने योजिला आहे. हें सि-चें धोरण विद्वत्तेने समर्थित व म्हणून अर्थबोधास उपकारक असलें तरी, तें पूर्वसंधारणास विरोधी असल्याने पुष्कळांस रुचलें नाहीं.

१२. सि-च्या कार्याचा परिणाम — समाज सामान्यतः पूर्वपरंपरेस चिकटणारा असतो. प्रायः सुधारणा घेण्याकडे त्याची प्रवृत्ति असत नाही. त्यामुळे सि-ने केलेल्या वरील

सुधारणा पुष्कळ विद्वानांस रुचल्या नाहीत. या वेळीं एकनाथ-प्रतीची **जवळची प्रत** तं-१ ही होती. पण ती लेखकाच्या अशिक्षितपणामुळे अशुद्धतम अशी होती; प्रत्यक्ष एकनाथी पोथी ही नष्ट झाली होती (परिच्छेद १५). तं-१-हून बऱ्या अशा इतरहि एकनाथीच्या कांहीं थोड्या प्रतिकृति लोकांत होत्या; पण त्या एखाद्या मठाने किंवा परंपरेने पुरस्कृत नव्हत्या. यांतील इ-प्रत लेखनतः बरीच शुद्ध व एकनाथास तं-१-च्या खालोखाल आसन्नकालीन असल्याने एकनाथीची प्रतिनिधि म्हणून गणण्यांत येत होती, पण ती बेतानेच. कोणत्याहि पोथींत आदर्श-पोथी म्हणून इ-चा उल्लेख नाही. अशा स्थितींत सि-पोथी, विशेष सुबोधार्थक असल्याने, पण मुख्यतः 'मूल-ज्ञानेश्वरीची यथास्थित प्रतिकृति' असल्याचा बाणा घोषित करीत असल्याने लोकांत महत्त्व पावूं लागली. तरीपण तींतील अतिरिक्त सुधारणा सहसा पटण्यासारख्या नसल्याने, लोकांमध्ये तिचें अनुकरण निष्ठेने केलें जात नव्हतें. अशा रीतीने (१) एकनाथी पोथी नष्ट, (२) तिची आसन्नकालीन प्रत तं-१ ही अत्यंत अशुद्ध, (३) इतर एकनाथी प्रतिकृति एकनाथीपासून दूरकालीन आणि परंपराविहीन व (४) सि-प्रत ज्ञानेश्वरीची यथामूल प्रतिकृति म्हणून मिरवत असली तरी तशी ती नसल्याने आणि सुबोधार्थक असली तरी तींतील सुधारणा अतिरिक्त असल्याने पूर्णतः पसंत नसलेली, —अशी या वेळीं स्थिति होती. तेव्हां **सर्वथा अनुसरणीय** अशी कोणतीच प्रत या काळीं नव्हती. यामुळे प्रतिकृति करण्यांत एक प्रकारचें अराजक माजलें. यामुळेच सि-प्रतीच्या नकला करितांना लेखक तींतील पाठांचा अतिक्रम वारंवार करितांना आढळतात. याच गोष्टीस अनुलक्षून (पृ. ६९) श्री. दवें म्हणतात; 'मूळ व नक्कल यांत साम्य अत्यंत थोडें आढळतें.' ही अव्यवस्था पाहून, विद्वानांत सहजच एकविधता आणण्याची इच्छा उत्पन्न झाली. याबरोबरच अर्थासाठी भाषेवर करण्यांत आलेलें आक्रमण त्यांस रुचलें नाही; व तदनुरूप त्यांचेकडून प्रयत्न करण्यांत आले. यांत गोपालाश्रमाचा प्रयत्न प्रधान होता.

**१३. गोपालाश्रमस्वामींचें कार्य**— ज्ञानेश्वरींत **यथाज्ञानेश्वरोक्त** पाठ घालणें ही गोष्ट गोपालाश्रम या विद्वानास विशेष अगत्याची वाटली. तिचें निर्वहण करण्यासाठी त्याने बऱ्याच ज्ञानेश्वरीच्या पोथ्या जमविल्या व त्या घेऊन त्याने विश्वनाथनगरी काशी येथे प्रयाण केलें. त्या ठिकाणीं त्याने स्वस्थतेने बसून भिन्नभिन्न पोथ्यांतील पाठांची तुलना करून, ज्ञानेश्वरीच्या भाषेविषयी व्याकरणदृष्ट्या विचार करून, शुद्ध रूपें ठरवून, त्यांस अनुसरून योग्य पाठ पोथ्यांतून निवडिले. हीं रूपें व्याकरणांतील **निश्चित नियमांस** धरून असल्याने सर्वत्र एकविध होतीं. यामुळे याने केलेल्या प्रतींतील पाठ सर्वत्र एक ठशाचे व म्हणून विकल्परहित असल्याने हिची नक्कल करितांना लेखकाचे हातून धरसोड होण्यास कारण उरलें नाही. पाठ योजण्याचें हें वरील धोरण या स्वामीने 'पाठ घातला पूर्वीचा' असें वर्णिलें आहे. या धोरणाची एकनाथी धोरणाशीं तुलना आपण मागे केलीच आहे (परिच्छेद ६). असो. येथील वर्णनानुसार ही गोपालाश्रमी प्रत, आपल्या धोरणाच्या कांटेतोल अनुसरणाने, प्रायः यथामूल उतरलेली दिसते.

येथपर्यंत एकनाथ, सिद्धनाथ व गोपालाश्रम यांचीं ज्ञानेश्वरींतील पाठभेदाविषयी भिन्नभिन्न धोरणें आणि तदनुरूप त्यांचे परिश्रम व त्यांचीं कार्ये आपण चर्चिलीं. ही चर्चा स्पष्टतर कळण्यासाठी कांहीं ओव्यांतील या तिघांच्या पाठभेदांचें परीक्षण करूं.

**४. पाठभेद-तुलना-कोष्टक—**

| | | एकनाथी (अनुमित) १५०६ | त १ १५१५ | इ १५५१ | रासं १ १६०४ | शि १५७२ | शा १६१६ | रा १६३२ | बोद्धव्य |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | आदर्श → | विविध प्रती | एकनाथी | तं १ | इ | इ | शि | अनुमित मूल | |
| (१) | २५ | जाणतेनो | जाणतेनो | जाणतेनो | जाणतेनो | जाणतेनो | जाणतेहिं | जाणतेन | शा व्याकरणाभिज्ञ |
| | | (स्वकालीकृत) | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | शुद्धीकृत | यथामूल | |
| (२) | २५ | कृतकार्या | कृतकार्या | कृतकार्थ | कृतकार्थ | कृतकार्थ | कृतकार्थ | कृतकार्या | इ-प्रभृति |
| | | (यथादर्श) | यथादर्श | स्वकालीकृत | (यथादर्श) | यथादर्श | यथादर्श | यथामूल | स्वकालीकृत |
| (३) | ३४ | सत्‌शास्त्रिक | शतशास्त्रिक | सनशास्त्रीक(सत्-?) | सत् शास्त्रिक | सत्‌शास्त्रिक | शतशास्त्रिक | भेली शास्त्रिक | तं१ इ शा अशुद्ध |
| | | (यथादर्श) | अशुद्ध | अशुद्ध | शुद्ध | शुद्ध | आदर्शभिन्न | यथामूल | |
| (४) | ४१ | नागरां | नागरा | नागरा | नागरा | नागरिक | नागरा | नागरां | सि स्वकालीकृत |
| | | (यथादर्श) | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | स्वकालीकृत | आदर्शभिन्न२ | यथामूल | |
| (५) | ७२ | — | — | — | — | जागतां प्रत्यक्ष | — | — | सि अर्थपरिष्कार |
| | | (यथादर्श) | (यथादर्श) | यथादर्श | यथादर्श | अर्थपरिष्कार | आदर्शभिन्न२ | | |
| (६) | ७९ | कामधेनु | कामध्येनु | कामधेनु | कामधेनु | कामधेनु | कामधेनु | कामधेनु | तं१ अशुद्ध |
| | | (यथादर्श) | अशुद्ध | शुद्ध | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथामूल | |
| (७) | ७९ | तया | तया | तया | तया | तया | तया | तेया | एकनाथ-स्वकालीकृत |
| | | (स्वकालीकृत) | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथामूल | |
| (८) | ९१ | परिकर | परिकर | परिकर | परिकर | दुस्तर | परिकर | परिकर | सि सार्थीकृत |
| | | (यथादर्श) | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | सार्थीकृत | आदर्शभिन्न२ | यथामूल | |
| (९) | ९८ | युयुधानु, सुभटु | युयुदानु, श्रुभटु | युयुधानु, सुभटु | युयुधानु, सुभटु | युयुधानु\| | युयुधानु | युयुधानु | तं१ अशुद्ध |
| | | (यथादर्श) | अशुद्ध | शुद्ध | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथामूल | |
| १०) | १०४ | मुख्य | मुख्य | मुक्ष | मुक्ष | मुख्य | मुक्ष | मुख्य | तं१ इ रासं·१ |
| | | यथादर्श | अशुद्ध | अशुद्ध | यथादर्श | शुद्ध | आदर्शभिन्न२ | यथामूल | शा अशुद्ध |

| | एकनाथी (अनुमित) १५०६ | तं १ १५१५ | इ १५६१ | रासं १ १६०४ | सि १५७२ | शा १६१६ | रा १६३२ | बोद्धव्य |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ादर्श→ | विविध प्रती | एकनाथी | तं १ | इ | इ | सि | अनुमित मूल | |
| ११२ | आमुच्या | आमुच्या | आमुचेया | आमुचिया | आमुचिया | आमुचेया | आमुचे॰ा | |
| | नवोदित | यथादर्श | आदर्शभिन्न | स्वकालीन | स्वकालीन | आदर्शभिन्न | यथामूल | |
| १३४ | काचया | काचया | काचयां | काचयां | काचयां | काचेयां | काचेयां | शा व्याकरणाभिज्ञ |
| | स्वकालीकृत | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | दथादर्श | शुद्धीकृत | यथामूल | |
| १३८ | कांतले | कांतले | कांतले | कांतले | वारू | कांतले | कांतले | सि सुबोधीकृत |
| | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | सुबोधीकृत | आदर्शभिन्न२ | यथामूल | |
| १४० | तया रथाचे | तया रथाचे | तया रथाचे | तया रथाचे | तया रथाचे | तया रथाचे | तेया रथाचे | एकनाथ-स्वकाली-कृत |
| | स्वकालीकृत | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथामूल | |
| १६९ | पेलावा | पेलावा | पेलावा | पेलावा | प्रेरावा | पेलावा | पेलावा | सि सुबोधीकृत |
| | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | सुबोधीकृत | आदर्शभिन्न२ | यथामूल | |
| १७० | सैनिक | शैन्यक | सैनिक | शैनिक | शैनिक | सैनिक | सैनिक | शा इ–चा |
| | यथादर्श | अशुद्ध | शुद्ध | अशुद्ध | अशुद्ध | आदर्शभिन्न२ | यथामूल | अनुयायी |
| २०० | निवातकवचांचा | निवातकवचांचा | निवातकवचांचा | निवातकवचांचा | निवातकवचांचा | निवातकवचाचा | कृतान्तु आंकणां | इ. एकनाथ-व्याघातवंचन |
| | व्याघातवंचन | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथामूल | |
| २०७ | न वधावे | न वधावे | न वधावे | न वधावे | न वधावे | न वधावे | नेघावे | एकनाथ-सुबोधी-कृत |
| | सुबोधीकृत | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथामूल | |
| २१२ | शेर्पी जाइल | सेर्शिजैल | वेचिजैल | वेजिजैल | वेचिजैल | वेचिजैल | शेर्पी जाइल | तं१ यथाश्रुत |
| | यथादर्श | यथाश्रुत | सार्थीकृत | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथामूल | इ सार्थीकृत |
| २६८ | अवछरि | अवसरि | अवछरि | अवसरि | अवछरि | अवखरि | अवस्वरि | शा अशुद्ध |
| | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | यथादर्श | अशुद्ध | यथामूल | |

(१५) विविध प्रतींतील पाठभेद— (क) सामान्य चर्चा—

(१) **जाणतेनं**—मूलतः तृतीया एकवचन. हें रूप एकनाथकाळीं मागे पडत चाललें असल्याने, तत्स्थानीं तुल्यप्राय आकाराचें 'जाणतेनो' हें स्वकालीन संबोधन एकनाथांनी चुकून घातलेलें दिसतें. या एकनाथीय रूपाचे स्थानीं, **शा**–चे लेखकाने इष्टार्थ–व्यक्तीस तृतीयेची अपेक्षा आहे, हें जाणून तत्कालीन तृ. अ. व. 'जाणतेहिं' ठेविलें आहे. यावरून हा लेखक बराच व्याकरणाभिज्ञ दिसून येतो.

(२) **कृतकार्यां** आणि (४) **नागरां** या पूरकविभक्ति लक्षांत न आल्याने तत्स्थानीं कृतकार्या, कृतकार्य, नागरा, नागर अशीं रूपें अव्यवस्थित योजण्यांत आलीं आहेत. या पूरकविभक्तीसाठी सोळावा परिच्छेद पहा. (३, ६, ९, १०, १६, २०) या ओव्यांतील 'शतशास्त्रिक' इ. रूपांच्या लेखनांत त्या-त्या लेखकाच्या शुद्धलेखन-ज्ञानाची कुवत दिसून येते. हे पाठभेद पाहतां दिसतें की, **शा**–चा घोषित आदर्श **सि** असला तरी तो वारंवार त्यास सोडून **इ**-ला अनुसरितो. ४१, ७२, ९१, ११२, १३८, १६८, १७० (५) **जागतां प्रत्यक्ष** यांत **सि**-चे लेखकाचा अर्थसौंदर्य साधण्याचा प्रयत्न स्पष्ट दिसतो. ७, ११, १४ (१२) आमुचेया-चे स्थानीं **तं १**-मध्ये आलेलें **आमुच्या** हें रूप सांगतें की, **एकनाथकालीं सर्वनाम, उपाख्यात** किंवा **षष्ठीविशेषण** एतदन्तींच्या **एया–इया–अया–या** या अवयवपरंपरेंतील **या** हा अवयव प्रचारांत येऊं पाहत होता. (१२) 'काचयां' इ. रूपांवरून ठरतें की, सामान्यतः सव्ययान्तींच्या एया-अया-या या अवयवपरंपरेंतील **अया** हा अवयव एकनाथकाळीं सुप्रतिष्ठित झालेला होता. त्याचें पुढील रूपान्तर **या** हें उदयोन्मुख होतें, हें वर आपण पाहिलेंच. आपलाच (**स्वः**) आहे काळ (**कालः**) ज्याचा तें (**यस्य तत्**) = स्वकालम्. हा **स्वकाल**-चा अर्थ लक्षांत घेऊन असें म्हणतां येतें की, **तेया**-चे स्थानीं एकनाथांनी ठेविलेलें **तया** हें रूप **स्वकालीकृत** आहे, एकनाथांनी 'आपल्या काळचें' म्हणून योजिलें आहे. (८) **परिकर** हा प्रायः पादपूरक असलेला शब्द **सि**-ने गाळून तत्स्थानीं संदर्भोपयुक्त अशा अर्थाचा बोधक **दुस्तर** हा शब्द योजिला आहे. यांत शब्दांच्या फुकट खोगीरभरतीविरुद्ध दिसणारा **सि**-चा आग्रह प्रशस्य आहे. (१५) **पेलावा** हा विवाद्य अर्थाचा शब्द गाळून, तत्स्थानीं **प्रेरावा** हा रोकडा विवक्षित अर्थाचा वाचक शब्द **सि**-ने योजिला आहे. हा अर्थनिश्चयावरील त्याचा कटाक्ष अभिनन्द्य आहे.

(ख) विशेष चर्चा—(१३८) ज्ञानेश्वर-समकालीन महानुभावीय वाङ्मयांतील-

> उच्चैःश्रवेगाचिये जवलिकेचे। **कांतले** सात्रायणींचे ॥ **पंचकल्याण** कल्हारिंचे। राजवाहकू ॥ सिंधुसागरींचे **वोरूं**। जालौरीचे **कैंकाण** घोरू। ऐसे सांघितां भेद अपारु। तेजियांचे ॥ (शिशुपालवध ९३६, ९३७).

या वर्णनावरून **कांतला** हा एक रंगादिकावरून पडलेला विशिष्ट प्रांतांतील घोड्याच्या प्रकाराचा वाचक शब्द आहे. 'मुरारि **कांतले** यावरी मिरविल' (९९४) इ. तीन ठिकाणीं हा शब्द या काव्यांत आढळतो. अर्थात् येथीलच अर्थाने हा शब्द ज्ञानेश्वरींत प्रयुक्त असावा. हा शब्द एकनाथांनीं बदलिला नाही. यावरून त्यांच्या काळीं तो शब्द सर्वथा अस्तंगत झाला नसावा; मात्र पुढे ५०–६० वर्षांनी **सि**-चे लेखकास तो शब्द लुप्त किंवा लुप्तप्राय वाटून तत्स्थानीं त्याने **वारू** हा सुपरिचित शब्द योजिला आहे. यावरून अनुमान—**सि**-चा लेखनकाल ज्ञानेश्वरांपासून दूरतर, एकनाथोत्तर, अर्थात १२७२ व १५७२ यांपैकी १५७२ असावा.

(२००) **आंकणां घालणें–आंकणा** म्हणजे पायांतील तोडा. जिंकिलेल्या शत्रूचें नांव भूषण व बढाई म्हणून जेता आपल्या तोड्यावर कोरवीत असे. हाच प्रघात 'परशुरामासि जिणोनि भीष्में तोडरी घातिला' (भागवत ९।३९६) या नायोक्तींत दिसून येतो. तोडा = **आंकणा** हें नाथांस केव्हांहि ज्ञात असलेंच पाहिजे. तेव्हा 'कृतांतु आंकणां घातला' याचे स्थानीं नाथांनी **निवातकवच** इ. पाठभेद घातला तो वाचकांस सुखाने अर्थबोध व्हावा, याच विचाराने हें उघड आहे.

(२०७) नेघावे<न घेआवे. घेणें<हन् 'मारणें'. 'बाण–वरि घेतील' (ज्ञा.२-२०४) 'दांडेनीर घेतली' (७-१६६) या ठिकाणीं हन्>घे=मारणें. तेव्हा **नेघावे** हें रूप अर्थास सर्वस्वी अनुकूल व यमकसंकेत पाळणारें असतां, तत्स्थानीं, अर्थदृष्टया आक्षेप्य नसलें तरी यमकसंकेताविरुद्ध असलेले 'न वधावे' हे शब्द योजणें कविस्वास उणेपणा आणणारें उघड आहे. अर्थात् तें ज्ञानेश्वरोक्त नसून, **नेघावे** हेंच ज्ञानेश्वरोक्त असावें. पण वाचकांच्या सोयीसाठी म्हणूनच तत्स्थानीं एकनाथांनी पाठभेद केलेला दिसतो.

ज्ञातव्य–अशा रीतीने बोधसौकर्यासाठी नाथांनी केलेले पाठभेद सामान्य वाचकास उपयुक्त असले तरी भाषाभ्यासाच्या दृष्टीने ते हानिकारकच होत.

(२१२) **सेशिंजैल**–शेपीं जाइल हा ज्ञानेश्वरोक्त पाठ होता; व तसाच तो एकनाथस्वीकृतहि असणार. तं१-ने दुसऱ्याने सांगून नकल करितांना **सेशिंजैल** असा कांही तरी उच्चार ऐकिला व अर्थ करण्याची विद्वत्ता अंगीं नसल्याने तसाच लिहिला. पुढे इ-ने तं१-ची नकल करितांना हें रूप अर्थहीन पाहून तत्स्थानीं विवक्षेनुसार **वेचिजैल** असें रूप योजिलें, व पुढे तेंच प्रायः सर्वांनी स्वीकारिलें.

येथे अनुमित होतें की, (१) इ-चे लेखकास (१५५१) एकनाथी प्रत मिळाली नाही. ती मिळती तर सेशिंजैल-चे स्थानीं त्याने 'शेपीं जाइल' असा मूलानुसारी सार्थ एकनाथोक्तच पाठ ठेविला असता, तत्स्थानीं पाठान्तर कल्पिलें नसतें. यावरून (२) एकनाथी प्रत एकनाथांबरोबरच (१५३१) लय पावली असावी. (३) 'सेशिंजैल' हें भ्रान्त रूप उच्चार-सादृश्याने स्पष्ट सांगतें की, येथे **मूल ज्ञानेश्वरोक्त पाठ 'शेपीं जाइल'** असाच असावा. (४) हाच पाठ (गोपालाश्रम = प्रात) रा-प्रतींत आढळत असल्याने, 'पाठ घातला पूर्वींचा' या प्रतिज्ञेनुसार घातलेले पाठ खरोखरच ज्ञानेश्वरांनी पूर्वीं प्रत्यक्षांत योजिलेले ठरतात. यावरून **पूर्वींचा पाठ** = यथाज्ञानेश्वरोक्त पाठ, हें समीकरण निर्विवाद सिद्ध होतें.

(१६) **पूरकाची विभक्ति कोणती असते ?**— (६-४५४) अमरीं **भाटां** होइजे (= देवांनी स्तुति करण्यासाठी भाट व्हावें.) येथे अमर हा **कर्ता**, भाट हें कर्तरि **पूरक**. भाट-पण हें हो-धातूच्या क्रियेचें कार्य आहे. वाक्यांतील **क्रियापदाच्या क्रियेने** कर्त्याचे अंगीं **उत्पादिलेला** धर्म कर्तरि पूरकाने सांगितला जातो. म्हणून **भाट** हें कर्तरिपूरक ठरतें. हें पूरक विविध रूपांत भिन्नभिन्न भाषांत आढळतें.

संस्कृत— अमरैः (तृ.) भाटैः (तृ.) भूयेत ।
ज्ञानेश्वरीकालीन– अमरीं (तृ.) भाटां (°आं) होइजे ।
वर्तमान मराठी–अमरांनी (तृ.) भाट (प्र.) व्हावें.

येथे दिसतें की, (१) तिन्ही ठिकाणीं कर्ता तृतीयान्त आहे. (२) पूरकाची संस्कृतांत तृ., वर्तमान मराठींत प्रथमा, तर ज्ञा. कालीं आं प्रत्ययान्त रूप आहे. हें रूप कोणत्या विभक्तीचें ?

**पूरक** हें क्रियापदाच्या क्रियेनें उत्पादित असून, तिच्या अर्थाची **पूर्णता** करितें. अर्थात् तें क्रियापदास गौण असतें. ( क ) क्रियापदास गौण असलेला शब्द प्रायः क्रियाविशेषण असतो. ( ३ ) संस्कृतांत क्रियाविशेषणाची विभक्ति द्वितीया असते. या द्विविध कारणास्तव पूरक हें क्रियाविशेषण म्हणून द्वितीयान्त ठरतें. पूरकाचें रूप, नित्य लिंगवचनानपेक्षा आम्-प्रत्ययान्त असतें. यामुळे ठरतें की, ज्ञानेश्वरी-मराठींत ( क ) कर्तरि पूरक आम्-प्रत्ययान्त द्वितीयेंत असतें. अर्थात् ( ख ) तत्स्थानीं वर्तमान मराठीनुसार प्रथमा योजणें म्हणजे व्याकरणभंग होय. ( वच्छहरण ४ ) तिहीं लोकीं **सरतेयां** होआवे । ( उद्धवगीता २०८ ) तुवां **तैसेयांचि** होआवें । इत्यादि ठिकाणीं महानुभावीय वाङ्मयांतहि कर्तरि-पूरकाची °आं-द्वितीया वारंवार आढळते.

---

# वार्षिक साधारण सभा

परिषदेची वार्षिक साधारण सभा येत्या मे महिन्यांत मुंबई येथे होणाऱ्या साहित्य-संमेलनाच्या अवधींत भरणार आहे. सभेचा निश्चित दिवस, वेळ व स्थळ वृत्तपत्रांतून एक आठवडा आधी जाहीर होईल. सर्वांनी सभेला यावें, ही विनंती.

**कामें**

( १ ) दुखवटा.
( २ ) मागील सभेचें इतिवृत्त.
( ३ ) १९४९–५० चें नियामक मंडळाने सादर केलेलें इतिवृत्त व जमाखर्च. ( पत्रिका अंक ९३ मध्ये पहा. )
( ४ ) १९५०–५१ चे नियामक मंडळाने सादर केलेलें अंदाजपत्रक ( पत्रिका अंक ९३ मध्ये पहा. )
( ५ ) शाखासभेने केलेल्या तहाहयात सभासदांच्या हिस्स्यासंबंधी नि. मंडळाने केलेली शिफारस ( घ. नि. ४८–२ ओळ २-मध्ये 'सर्व प्रकारच्या सभासदांच्या रोख वर्गणीपैकी.' ) असे शब्द घालावे.
( ६ ) हिशेबतपासनिसांची नेमणूक.
( ७ ) इतर ठराव. *
( ८ ) पुढील संमेलनाच्या निमंत्रणांचा विचार.
( ९ ) अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळीं येणारीं कामें.

रा. श्री. जोग
कार्याध्यक्ष

शं. द. जावडेकर
अध्यक्ष

---

* वार्षिक सभेसाठी पाठविण्याचे ठराव कार्यालयाकडे २५ एप्रिल १९५० च्या आंत यावे.

टीप — वार्षिक सभेच्या वेळीं अंदाजपत्रक किंवा इतर बाबींबद्दल सभासदांना कांही प्रश्न विचारावयाचे असल्यास त्यांची सूचना ३० एप्रिलपर्यंत कार्यालयाकडे आल्यास सोयीचें होईल.

पुस्तक-परीक्षण

# महात्मा गांधी

लेखकः— वि. स. खांडेकर

प्रा. गोवर्धन पारीख यांचें महात्मा गांधी हें पुस्तक आकाराने छोटें असलें तरी गुणांनी मोठें आहे. गांधींच्या विषयी त्यांच्या हयातींतच विपुल वाङ्मय निर्माण झाले. त्यांच्या मृत्यूनंतर पुन्हा एकदा त्याची लाट उसळली पण गांधीजी व गांधीवाद यांच्याविषयीं लिहिणाऱ्या लेखकांत श्रद्धा, भक्ति, आदर इत्यादिकांनी प्रेरित होऊन लिहिणारेच अधिक. त्या सर्वांच्या वाङ्मयावर विभूतिपूजेची छाया नकळत पसरलेली दिसते. विभूतिपूजा ही नेहमीच सत्याच्या दर्शनाला मारक ठरते. गांधीजींच्यावर अनेकांनी कडकडून टीकाहि केल्या आहेत. एकीकडून हिंदुमहासभावादी व दुसरीकडून मार्क्सवादी विचारकांनी आणि प्रचारकांनी वेळोवेळीं त्यांच्यावर निकराचे हल्ले चढविले आहेत. पण विभूतिपूजकांप्रमाणे विरोधकांनाही सत्याचें दर्शन संपूर्णपणाने होत नाही. प्रा. पारीख यांचें पुस्तक या दोन्ही वर्गांच्या अनेक दोषांपासून अलिप्त आहे. त्यांना गांधीजीविषयी आदर आहे. पण अंध-भक्ति मुळीच नाही. चिकित्सा म्हणजे वेडीवांकडी चिरफाड नव्हे हें ते पूर्णपणें जाणतात. पण रोग्यावर शस्त्रक्रिया करतांना डॉक्टराने आपला हात कांपूं देतां कामा नये, याचा त्यांना कधी विसर पडत नाही. तात्त्विक विवेचन करतांना काव्य किंवा पांडित्य यांचा आश्रय करणारे आपल्या उद्दिष्टापासून दूर भटकत जातात हेंहि त्यांना माहीत आहे. आपलें प्रतिपादन अलंकृत करून मांडण्याचा किंवा पांडित्यप्रदर्शनाचा मोह या पुस्तिकेंतल्या पांच लेखांत त्यांनी स्वतःला कुठेहि होऊं दिलेला नाही. त्यामुळे गांधीजीकडे एक थोर ऐतिहासिक व्यक्ति या दृष्टीने पाहूं इच्छिणाऱ्या आणि त्यांच्या जगभर गाजलेल्या तत्त्वज्ञानांतले गुणदोष प्रामाणिकपणाने जाणूं इच्छिणाऱ्या वाचकाच्या विचाराला या पुस्तिकेंत बरेंच खाद्य मिळेल.

उदाहरण म्हणून गांधीवाद व समाजवाद यांच्याविषयींचे पारीख यांचें विवेचन पहावें. मध्यंतरी दहा बारा वर्षे तरी गांधीवाद व समाजवाद यांच्या स्वरूपांत साम्य आहे, जणू कांही ते दोघे जुळे भाऊ आहेत, त्यांचा समन्वय सहज करतां येईल, अशा प्रकारचे प्रतिपादन आपल्याकडले मोठमोठे पंडित करीत होते. कठोर वस्तुस्थितीपेक्षा मोहक स्वप्नरंजन मनुष्याला स्वभावतःच प्रिय असल्यामुळे जनता त्याच्यावर विश्वास ठेवीत होती. प्रा. पारीख यांनी त्या गोड भ्रमाचा बुडबुडा आपल्या पुस्तकांत स्पष्टपणें फोडला आहे. ते म्हणतात, ' उत्पादनांच्या साधनांत भरपूर वाढ झाली असल्या कारणाने समाजवादाला अभिप्रेत असलेल्या समाज-व्यवस्थेंत सर्वांनांच आपापल्या गरजा पुऱ्या करतां येतात. हें समाज-व्यवस्थेचें आदर्शभूत चित्र गांधीवादांत बसूं शकत नाही. वर्गविहीन समाजरचनेला आदर्श म्हणून म्हणतांना समाजवादाने लावलेलें मोजमाप हें ऐहिक आहे. व्यक्तिस्वातंत्र्य व व्यक्तीच्या विकासाला संधि हें त्याचें खरें सार आहे. गांधीवादाचा आदर्श ऐहिक मोजमापाने ठरतच नाही ... ज्यांत एका वर्गाचें दुसऱ्या वर्गाकडून शोषण होतें, एका वर्गाची श्रमशक्ति खर्च होऊन निर्माण झालेली संपत्ति दुसऱ्याच्या जीवनाचें साधन बनते, अशा प्रकारची आजची अर्थोत्पादन पद्धति हीच अनेक आर्थिक अनिष्टांचें मूळ आहे असें समाजवादाचें स्पष्ट मत

* महात्मा गांधीः— ले० गोवर्धन पारीख, प्रका० प्रतिभा प्रकाशन, जव्हार मूल्य २ रु.

आहे. उलट गांधीवादाने या बाबतींत विश्वस्ताचा सिद्धांत मांडला आहे. हा फरक केवळ मार्गापुरता नाही हे ध्यानांत घेतलें पाहिजे. मानवजातीवरील प्रेम व तिचें आर्थिक शोषण एकत्र नांदूं शकतात हे स्वतः गांधीजींचेच उद्गार आहेत ... केवळ जीवनाबद्दल दया असावी, सर्वांनी प्रेमाने, बंधुभावाने वागावें एवढीच शिकवण गांधीवादांत आहे. विश्वबंधुत्वावर आधिष्ठित असा समाज निर्माण करण्याचा ज्ञानावर अधिष्ठित असलेला मार्गहि त्यांत कोठेंच आढळत नाही. बंधुत्व निर्माण करावयाचें म्हणजे शत्रुत्व कां उत्पन्न होतें याचा विचार करणें आवश्यक आहे. त्याचीहि सुसंगत चिकित्सा व चर्चा त्यांत कोठेच दिसत नाही ... गांधीवादाच्या तीस वर्षांच्या शिकवणुकीने जीवनाकडे पाहण्याच्या सामान्य माणसाच्या दृष्टिकोनांत कोणताहि मौलिक वा मूलभूत बदल घडून आला नाही. उलट भ्रामक समजुती जुने विचार, जुनी दृष्टि यांना पोषक असेंच सांस्कृतिक वातावरण देशांत कायम राहिलें. त्यांत अडाणीपणा, असहिष्णुता, स्वमताबद्दलचा हेकटपणा इत्यादि गोष्टी वाढतच गेल्या. गांधीवादाची शिकवण धार्मिकतेवर आधारलेली असल्यामुळे ढोंगीपणा आपोआपच निर्माण झाला.'

प्रा० पारीख व या पुस्तकाचे प्रस्तावनाकार तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी या दोघानाही गांधीजीविषयीं प्रेम व आदर आहे. गांधी या व्यक्तीचें माहात्म्य ते पुरेपुर जाणतात. पण गांधींनी प्रवर्तित केलेलें व भारतीय जीवनाच्या सर्व क्षेत्रांत एक पिढीभर अनिरुद्धपणें संचार करीत असलेलें त्यांचें तत्वज्ञान सदोष आहे हें स्पष्टपणाने प्रतिपादन करायला व तें शास्त्रशुद्धतेच्या निकषावर घासून पहायला ते कचरत नाहीत.

प्रा० पारीख म्हणतात, 'गांधीचें अमरत्व त्यांच्या मानव-प्रेमांत आहे. तीच त्यांची खरी शिकवणूक आहे. ती श्रद्धेवर, धर्मावर आधारलेली असल्यामुळे प्रभावी होऊं शकली नाही. तथापि ती बुद्धीवर अधिष्ठित करून त्यांचें कार्य पुढे नेणें शक्य आहे. असें झाले तरच गांधी इतिहास घडविणारे होतील. आज देशांत असलेल्या परिस्थितीचे त्यांना निर्माते म्हणणें हा त्यांच्या व्यक्तित्वाचा अपमान आहे. त्यांचें अपुरें राहिलेलें कार्य पुढें नेणें की त्यांचीं मंदिरें बनवून, पुतळे उभारून त्यांना विसरणें हा मागे राहिलेल्या व शोक करणारांच्या पुढील खरा प्रश्न आहे.'

गांधीजींच्या वधानंतर लगेच प्रा० पारीख यांनी हे लेख लिहिले. त्या लेखनाला आतां दोन वर्षे झालीं आहेत. या चोवीस महिन्यांत घडलेल्या सर्व घडामोडी लक्षांत घेतल्या, मोठमोठ्या मंत्र्यांनी आणि पुढाऱ्यांनी ठिकठिकाणीं केलेलीं लांबलचक प्रवचनें वाचलीं, साखरेपासून पाकिस्तानपर्यंतचे निरनिराळे प्रश्न आपण कसे हाताळीत आहों हें पाहिलें, चिघळत चाललेल्या नव्या जुन्या अनेक संघर्षांना प्रगतीशील दृष्टीने तोंड द्यायची आपली कितपत तयारी आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे गांधींजींच्या तत्वापासून आणि त्यांच्या ध्येयवादापासून आपण हळूहळू दूर जात आहों असे निश्चित वाटूं लागतें. मीरा बेन यांनी एके ठिकाणीं म्हटलें आहे, 'उभ्या जगांत खरा गांधी आश्रम एकच आहे तो म्हणजे बापूंची गादी आणि त्यांचें लिहिण्याचें बैठे मेज यांना व्यापणारी ती कांही चौरस फुटांची जागा.' आजची परिस्थिति पाहिली म्हणजे या सूचक वर्णनांतले कटु सत्य मनाला तीव्रतेनें बोचतें. वाटतें, गांधीजीना आम्ही साऱ्या लोकांनीं फसविलें. त्यांच्या व्यक्तिमत्वानें दिपून जाऊन त्यांच्या शिकवणुकीच्या प्रत्येक शब्दाला आम्ही अंधपणाने मान डोलावली. पारतंत्र्याविरुद्ध

लढायला आम्हांला एक जबरदस्त पुढारी हवा होता. तो मिळावा म्हणून त्यांच्या सर्व अटी आम्ही मुकाट्याने मान्य केल्या. पण ती लढाई संपल्यावर त्या पाळायची जरूरी नाही असें मनांत म्हणतच! त्यांची उदार शिकवण हा कांही केवळ राजकारणांतला एक डाव नव्हता. मानवी जीवनाची विस्कटलेली घडी नीट बसावी म्हणून धडपडणाऱ्या एका महात्म्याने आत्मक्लेशाने शोधून काढलेली ती पाऊलवाट होती. त्या पाऊलवाटेवर कांटे असतील, वेडी वांकडी वळणें घेत घेत ती कुठें जात आहे याची पाहणाराला कल्पना येत नसेल, कदाचित ती एखाद्या भयंकर अरण्यांत लुप्त होत असेल. प्रचलित राजमार्ग सोडून त्या पाऊलवाटेने जाण्यांत धोका आहे असें अनेकांना प्रामाणिकपणाने वाटलें असतें तर त्यांत गैर असें काय होतें? पण ज्यांना त्या वाटेने जायचें नव्हतें त्यांनी आपण तिकडे वळलों आहों असा भास उत्पन्न करून गांधींच्या डोळ्यांत धूळ फेकायला नको होती!

ही आत्मवंचना आता तरी भारतीय जनतेने कटाक्षाने टाळली पाहिजे. विनोबाजी भाव्यांसारखी संपूर्ण गांधीवाद पचविणारी माणसें व्यक्तिशः कितीहि चांगलीं असलीं तरी सामाजिक अधःपाताला तीं आळा घालूं शकत नाहीत ही गोष्ट गेल्या दोन वर्षांत पुनः पुन्हा उघड झाली आहे. मागे-मला वाटतें इंदूरलाच-विनोबाजी काळा बाजार करणाऱ्या व्यापाऱ्यां-विरुद्ध जीव तोडून बोलले होते. पण जगांतली दुर्जनता सत्ताहीन सज्जनांच्या निषेधाला तृणवत् लेखते हा सनातन अनुभवच त्या वेळीं त्यांना आला. आजकाल गांधीवादाचा आत्मा असलेलीं नैतिक मूल्यें मूठभर प्रामाणिक लोकांकडून व्यक्तिजीवनांत पाळलीं जात असलीं तरी आपलें सर्वसामान्य सामाजिक जीवन अधिक खालच्या पातळीवर घसरलें आहे. मोठ-मोठ्या शहरांतून फिरून पहावें, विविध व्यवहार करणारांशीं बातचीत करावी, ज्या संस्कृतीचा आपण अभिमान बाळगतों ती हॉटेल संस्कृति किंवा सिनेमा संस्कृति बनूं पाहत आहे हें चटकन् ध्यानांत येईल. हिरवी नोट ही आजच्या हिंदी समाजांतली सर्वश्रेष्ठ देवता आहे, आपल्या भक्ताला ती कुठलाहि वर देऊं शकते. गांधीजी श्रमपावित्र्याचा सतत पुरस्कार करीत राहिले. पण आजच्या जीवनांत हरएक क्षेत्रांत, दलालांचा, बांडगुळांचा, आणि उपट-सुंभांचा एक भला मोठा नवा वर्ग निर्माण झाला आहे. जुन्या भारतीय संस्कृतींतली उच्च मूल्यें आम्ही कधीच गमावलीं. पण पाश्चात्य संस्कृतींतल्या श्रेष्ठ मूल्यांचा विचारपूर्वक स्वीकार करण्याची आम्हांला अजून तादृश आवश्यकता भासत नाहीं. आमचे विद्यार्थी अद्यापि विज्ञानपराङ्मुख आहेत. आमचे शेतकरी अडाणी आणि धर्मभोळे आहेत. आमचे व्यापारी दलाल आहेत. आमचे सुशिक्षित लोक कुणाचे ना कुणाचे बंदे गुलाम आहेत. कुठल्याहि प्रकारच्या ध्येयवादाने जनता उजळलेली नाही, भारावलेली नाहीं. त्यामुळे विकलता आणि विफलता यांच्या भेसूर छाया सामाजिक जीवनावर प्रत्यहीं अधिक मोठ्या प्रमाणांत पसरत आहेत.

असें का व्हावें? उज्ज्वल सूर्यप्रकाशाने नटलेल्या एका शिखराकडे आपण जात आहों अशी गेलीं पंचवीस तीस वर्षें आपली खात्री होती. पण आज आपण कुठें आहोंत? तर काळोखाने भरलेल्या एका खोल दरीच्या तोंडाशीं! आपली पावलें डळमळत आहेत, पायांखालची जमीन खचत असल्याचा अधुनमधून आपल्याला भास होत आहे. या दरींत आपण केव्हा फेंकले जाऊं ही भीति प्रत्येकाच्या चेहऱ्यावर प्रतिबिंबित होत आहे. गांधीजींच्या पाव शतकाच्या अलौकिक कर्तृत्वानंतर भारतीय जीवनांत इतकी अशाश्वती

अनुक्रमणिका

आणि दुर्बलता निर्माण व्हावी ही जितक्या लज्जेची आणि दुःखाची तितकीच भाविष्य-कालाच्या दृष्टीने भीतीची आणि विचाराची गोष्ट आहे.

आजकालच्या विफलतेंत, विकलतेंत, अशाश्वतींत आणि अस्थिरतेंत सर्व दोष आपलाच आहे असें नाहीं. गेल्या तीन तपांत सारें जग धरणीकंपाच्या धक्क्यांनीं पुनः पुन्हा हादरत आहे. या धक्क्यांनीं बहुतेक जुनीं मंदिरें आणि घरें ढांसळून पडत आहेत. सर्व जीवनमूल्यांचा-एकेकाळीं शाश्वत मानल्या गेलेल्या नीतिमूल्यांपासून यंत्रयुगाने निर्माण गेलेल्या चंचल आर्थिक मूल्यापर्यंत सर्वांचा-फेरविचार आणि पुनर्घटना केल्याशिवाय जगांत शांति प्रस्थापित होणें अशक्य आहे. जीवनांतला हा गोंधळ मोठमोठ्या पाश्चात्य लेखकांना सुद्धां अत्यंत तीव्रतेने जाणवूं लागला आहे. या धुक्यांतून बाहेर पडण्याची धडपड ते अधिक अधिक प्रमाणांत करीत आहेत.लेविस ममफोर्डचें 'Faith for living,' ॲलेक्सिस कॅरेलचे 'Man, the unknown' आल्डस् हॅक्स्लेचे 'Ends and the means, जोडचे 'Decadence' ' हीं पुस्तकें वाचतांना गांधीजींची आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाची आठवण झाल्यावांचून राहत नाही याचें कारण हेंच होय. हे सर्व विचारवंत प्रथमत: निरनिराळ्या ठिकाणाहून प्रवासाला निघाले असतील. पण पुढल्या पर्यटनांत त्यांच्या वाटा आणि गांधीजींचे मार्ग एकाच दिशेने जात आहेत. हें लक्षांत घेतलें म्हणजे गांधींच्या आध्यात्मिक व्यक्तित्वा-विषयींचा आपला आदर वृद्धिंगत झाल्यावाचून राहात नाहीं

पण आध्यात्मिक क्षेत्र हें व्यक्तीपुरतें स्वतंत्र असतें. कुठल्याहि क्षेत्रांतला व्यक्तीचा विकास निरनिराळ्या कारणांनी त्वरित होण्याची शक्यता कोण नाकारील ? बुद्धीची कुशाग्रता आणि भावनांची उत्कटता लाभलेल्या व्यक्तीच्या जीवनांत अल्पकाळांत अभूतपूर्व आध्यात्मिक स्थित्यंतर होऊं शकतें. स्टीफान झ्वाइगने टॉलस्टॉयच्या आयुष्यांत घडलेल्या अशल्या परिवर्तनाचें मोठें सूक्ष्म आणि मार्मिक वर्णन 'The Living Thoughts Library' मधल्या टॉलस्टॉयच्या वेंचक उताऱ्यांच्या प्रस्तावनेंत केलें आहे. पन्नाशीच्या घरांत येईपर्यंत टॉलस्टॉय बहिर्मुख वृत्तीचा होता. त्यावेळीं ऐहिक सुखाची सर्व साधनें हात जोडून त्याच्या-पुढे उभीं होतीं. बुद्धि, कला, प्रतिष्ठा, आरोग्य, कौटुंबिक जीवन कुठल्याहि गोष्टींत त्याला कशाचीहि न्यूनता नव्हती. असें असून आयुष्याच्या मध्यभागीं तो एकदम अस्वस्थ होऊन गेला. अनामिक औदासीन्याने त्याचें मन काजळून गेले. पत्नी, मुलें, लेखन, कशांतच त्याचें मन रमेना. जणू कांही सारा जीवनरस आटला. आत्महत्त्येच्या भीतीने त्याने आपली शिकारीची बंदूक कडीकुलुपांत घालून ठेवली. शेवटीं या अवस्थतेच्या मुळाशीं तो गेला. तेव्हा अनेक अज्ञात प्रश्न त्याच्यापुढे उभे राहिले. तो विचार करूं लागला—माझ्या जीवनाचा अर्थ काय ? पाप आणि पुण्य यांची जी तीव्र जाणीव माझ्या मनामधें आहे तिचा जीवनाच्या प्रगतीशीं काय संबंध आहे ? आयुष्य कसें घालविलें असतांना आपणांला पूर्ण समाधान मिळेल ?

गांधीजींच्या पूर्व आयुष्यांत असलेच अनेक प्रश्न दत्त म्हणून त्यांच्यापुढे उभे राहिले होते. त्यांचीं उत्तरें शोधून काढण्याचा प्रयत्न करतां करतां ज्याला आपण गांधीवाद हें नांव देतों ती तत्त्वप्रणाली त्यांच्या जीवनांत रूढ होत गेली. व्यक्तीच्या आत्मविकासाच्या दृष्टीने ती पुष्कळ उपयुक्त व बरीचशी निर्दोष आहे यांत शंका नाही. आपल्या अभिनवतेमुळे तिने एका बलाढ्य साम्राज्यशाहीशीं थोड्याफार यशस्वीपणाने टक्कर दिली हेंहि इतिहासाला मान्य करावें लागेल. पण तें तत्त्वज्ञान सामाजिक मनाला जसेंच्या तसें लागूं करण्यांत दंभाचा आणि आत्मवंचनेचा फार मोठा धोका निःसंशय होता. व्यक्तिमन आणि

सामाजिक मन यांच्यांत नेहमीच दोन ध्रुवांचें अंतर असतें. 'Man is kind; but men are cruel' या टागोरांच्या उक्तींत तें अंतर अत्यंत स्पष्टपणानें सूचित केलें गेलें आहे. व्यक्ति प्रसंगीं चटकन् अंतर्मुख होऊं शकते. पण समाज नेहमीं बहिर्मुखच राहतो. त्याची भक्ति आणि भीति, प्रीति आणि द्वेष हीं सर्व विचारांपेक्षां विकारांतून उगम पावतात. व्यक्तिमनाला उच्च जीवन मूल्यांचें त्वरित आवाहन होऊं शकतें. एवढेंच नव्हे तर तीं तिच्या आचरणांतहि प्रगट होतात. सामाजिक मन त्या दृष्टीनें जड, बधिर व अगतिक असते. त्याच्या वरच्या थरांत नव्या तत्वप्रणालीचीं बीजें पडलीं कीं थोडे दिवस तिथें हिरवे अंकूर दिसतात पण ते लवकरच करपतात.

शिवाय गांधीजींनी ज्या समाजांत आपलीं अध्यात्मिक मूल्यें रुजविण्याचा प्रयत्न केला तो संघटित, सुसंस्कृत आणि सुविकसित नव्हता. जातिभेदाने पोखरलेला, धर्मभेदाने भग्न झालेला, अस्पृश्यतेचा हिडिस कलंक जडलेला, आर्थिक विषमतेच्या सडूं लागलेल्या जखमांनी बुजबुजलेला भारतीय समाज–उध्वस्त वास्तूच्या भिंती रंगवूं लागावें तसा त्याच्या बाबतींत गांधीजींच्या शिकवणुकीचा प्रकार झाला.

या समाजांत पवित्र प्राचीन संस्कृतीच्या गप्पा मारणारे लक्षावधि लोक होते. पण जनावराचें जिणें जगणाऱ्या आपल्या देशबांधवांना आणि धर्मबांधवांना पोटाशीं धरण्यापर्यंत त्यांची मजल कधींच पोंचली नाहीं!! परलोक आणि परमेश्वर यांच्यावरल्या श्रद्धेच्या बेड्या सर्वांच्याच पायांत असल्यामुळे समाज या नांवाने संबोधिल्या जाणाऱ्या या प्रचंड तुरुंगांत मोठमोठे दंगे फारसे होत नसत हें खरें आहे. पण इंग्रजी शिक्षण सुरू होऊन ज्या क्षणीं परलोकावरला आणि परमेश्वरावरला सामान्य मनुष्याचा विश्वास डळमळला, त्याच क्षणीं या शतकानुशतकें झोपी गेलेल्या ज्वालामुखीच्या स्फोटाची पूर्वतयारी सुरू झाली.

क्षणाक्षणाने आणि कणाकणाने कमी होत चाललेल्या सामान्य मनुष्याच्या या धर्मश्रद्धेकडे गांधींनी दुर्लक्ष केलें ते आपल्यावरून जग ओळखीत होते. हजारों लोक त्यांच्या प्रार्थनांना जमत, 'वैष्णव जन' आणि 'रघुपति राघव' म्हणत. पण महात्माजींची ईश्वरावर जी श्रद्धा होती तिचा ओझरता स्पर्श तरी त्या हजारांपैकी एखाद्याला झाला असेल किंवा काय याची शंकाच आहे. तो व्हावा तरी कसा? जीवनांत धर्मनिष्ठेची जागा अर्थनिष्ठेने घेतलेली. जुन्या काळांतल्या कृत्रिम आध्यात्मिक पातळीवरून प्रत्येकाचें मन आधिभौतिक पातळीवर आलेलें. त्याला खऱ्याखुऱ्या आध्यात्मिक पातळीवर नेण्याचा गांधीजींनी प्रामाणिक प्रयत्न केला पण तो निष्फळ आहे हें त्यांना कधीच जाणवलें नसेल असें म्हणवत नाही. आदर्शामागे लागलेल्या महापुरुषाची स्थिति मृगजळामागे धांवणाऱ्या हरिणासारखी होते. त्याला मधे थांबता येत नाही; परततां येत नाही; त्या लखलखणाऱ्या जळाचें सौंदर्यहि कांही केल्या कमी होत नाही. तसें त्यांच्या बाबतीत झाले असावें. नौखालीच्या हत्याकांडापासून मृत्युच्या दिवसापर्यंत गांधीजींचे सर्व उद्गार वाचले, दिल्ली डायरी बारकाईने चाळली म्हणजे महापुरुषांचीं दुःखें किती मोठीं असतात या जाणिवेने सामान्य माणसाचें मन भयचकित झाल्याशिवाय राहत नाही.

आध्यात्मिक जीवनमूल्यांवर गांधींजींनी दिलेला भर व्यक्तिजीवनांत अनक दृष्टींनी बरोबर होता. पण धार्मिक, आर्थिक आणि सामाजिक भेदांनी ग्रासलेल्या भारतीय समाजाच्या

[ पान ४४ पाहा ]

# — परीक्षणें —

**जातिप्रस्तार आणि तद्गुणितें**— [ ले० आ. बा. लिमये, कपिलाश्रम, १२८ सदाशिव पेठ, पुणें २. पृ. १२८, किं. २॥ रु. साधा कागद २ रु.]

छंदःशास्त्र व संगीतशास्त्र यांतील प्रस्तारविषयक गणितरीतीचें विवेचन करणें हा प्रस्तुत पुस्तकाचा विषय आहे. १ प्रस्तारखंड, २ सूचि-मेरुखंड, ३ मेळखंड, ४ पर्यायखंड, ५ आचार्यांची पंचश्लोकी आणि ६ तद्गुणितविस्तारखंड अशा सहा भागांत विषय विभागला असून पुढे ३ परिशिष्टें जोडिलीं आहेत. विशिष्टाक्षरी वृत्ताचे लघुगुरुक्रमभेदानें जे भिन्न प्रकार होतात त्यांस प्रस्तार असें म्हणतात. हे प्रस्तार किती अक्षरीवृत्ताचे किती संभवतात, ते क्रमवार कसे मांडावे, प्रस्ताराच्या क्रमांकांवरून एकदम तो प्रस्तार कसा मांडावा, तसेंच प्रस्ताराकडे पाहून त्याचा क्रमांक कसा ओळखावा इत्यादिकांच्या पिंगलोक्त व वृत्तरत्नाकरांतील रीति पहिल्या प्रस्तारखंडांत दिल्या आहेत. छंदःशास्त्रांत लघु व गुरु असे दोनच घटक असतात पण संगीतात सप्त स्वर असल्याने अधिकहि घटक येतात यामुळे त्यांतील प्रस्तारांचा विस्तार अफाट होतो शिवाय त्यांत स्वर आनुपूर्वी राखून घेणें किंवा कसेंहि घेणें यामुळेहि भिन्न प्रकार होतात. या सर्वांचा समावेश करण्यासाठी लेखकाने प्रस्तार या शब्दाऐवजी 'जातिप्रस्तार' असा शब्द योजिला आहे तो योग्यच आहे. मात्र 'आनुपूर्वी न पाहणें' या अर्थानें 'पौर्वापर्य' शब्द योजिला आहे तो समर्पक वाटत नाही. प्रस्ताराचा क्रमांक ओळखण्याच्या पिंगलोक्त व वृत्तरत्नाकरांतील अशा दोन रीति दिल्या आहेत त्या सकृद्दर्शनीं अगदी भिन्न वाटतात; पण त्यांचें उत्तर एकच येतें. तेव्हा त्यांत साम्य असलेंच पाहिजे. यास्तव प्रस्तारपटाच्या निरीक्षणाने एकाच तत्त्वानुसार या दोन रीति कशा सुचतात त्याचें स्पष्टीकरण केलें असतें तर येथे वाचकांस वाटणाऱ्या संदेहाचें निरसन झालें असतें. प्रस्तारांमध्ये एकगुरु, द्विगुरु इ० किती किती उत्पन्न होतात हें सूचिमेरूवरून कसें सुलभपणें समजतें याचें विवेचन सूचिमेरुखंडांत केलें आहे. रामजोशी यांनी छंदोमंजरींत दिलेले मेरुहि येथे दिले आहेत. त्याचप्रमाणे वाणी भूषणांतील वर्णमेरु व मात्रामेरु आणि दोन्ही प्रकारच्या पताका दिल्या असत्या तर अधिक बरें झालें असतें. एकगुरु, द्विगुरु इत्यादिकांची संख्या मेरूवरून कळते पण ते कोणत्या स्थानीं येतात तें स्थान त्यावरून कळत नाही, तें पताकेवरून कळतें. स्वरप्रस्तार किती प्रकारचे व कसकसे होतात याचें गणिताधारें सविस्तर विवेचन मेळखंड व पर्यायखंड या भागांत केलें आहे, तें संगीताच्या अभ्यासकांस विशेष उद्बोधक वाटेल. संगीतरत्नाकरांतील स्वरप्रस्तारांची मांडणी व तालविवेचन सामान्यतः फार दुर्बोध मानलें जातें तें या पुस्तकांतील विवेचनाने बरेंच सुबोध होईल, असें म्हणावयास प्रत्यवाय नाही. न अक्षरीवृत्ताचे प्रस्तार म्हणजे $(ग+ल)^{न}$ याचेंच उत्तर होय. 'घात' यास छंदःशास्त्रांत 'तद्गुणित' म्हणतात. म्हणून तोच शब्द लेखकाने योजिला आहे. $(ग+ल)^{न}$ हें कृत्य करितांना न + १ इतकींच पदें कशीं उत्पन्न होतात, त्यांत ग चे घात क्रमाने कसे उतरत जातात व ल चे

कसे चढत जातात आणि या पदांस गुणक कोणते येतात हें बीजगणितांत 'बायनोमिअल-थिअरम'ने सांगितलें असतें. हा घात प्रस्तारपटांत प्रत्यक्ष दिसतो व सूचिमेरूंत त्यांतील गुणकांक क्रमाने सांपडतात. त्याशिवाय त्यांत संकलित श्रेणीपरंपराहि उत्पन्न होतात, त्यांचें विवेचन लेखकाने चागलें केलें आहे. भास्कराचार्यांची लीलावतींतील जी पंचश्लोकी दिली आहे तींतील पहिल्या श्लोकांत हे गुणकांक काढण्याची सुगम रीति दिली आहे ती वाचकांस अभिनव वाटेल. या रीतीचा उपयोग कोठे कोठे होतो हें पुढील दोन श्लोकांत दिलें असून त्यापुढील दोन श्लोकांत ३ उदाहरणें दिलेलीं आहेत. पिंगलाने प्रस्तारसंख्या काढण्याची जी रीति दिली आहे तींवरून त्यास घातांकांचें संकलन आणि गुणन यांची बरोबर कल्पना होती असें दिसून येतें. त्याचप्रमाणे सुश्रुतांत षड्रसांचे ६३ शुद्ध मेळ कसे होतात तें क्रमवार सांगितलें आहे. पिंगलाचा काल इ. पू. २०० ते ५०० व सुश्रुताचा इ. पू. ५०० ते ७०० समजतात. तेव्हा इतक्या प्राचीन काळीं भारतीयांची गणितांत किती प्रगति झालेली होती हेंहि यावरून कळणार आहे. गणित, छंदःशास्त्र व संगीत यांचे अभ्यासकांस हें पुस्तक उपयुक्त व संग्राह्य आहे.

**य. ग. फफे**

### मराठी साहित्य का इतिहास—[ ले० प्रा. ना. वा. गोडबोले एम्. ए. प्रका० गयाप्रसाद अँड सन्स, आग्रा : मूल्य तीन रुपये ].

प्रा. गोडबोले यांनी हिंदी भाषेमध्ये लिहिलेला हा मराठी वाङ्मयाचा इतिहासग्रंथ आहे. हिंदी ही आतां राजभाषा म्हणून मान्य झाली असल्याने भिन्न भिन्न प्रांतांतील लोकांस एकमेकांच्या वाङ्मयाचा परिचय करून देण्याचें हिंदी हेंच माध्यम ठरतें. या कारणाने, व कांहींसें राजभाषेचें वैभव वाढविण्याचें म्हणजे तींत विविध प्रकारच्या ग्रंथांची भर घालण्याचें कार्य आपण सर्वांनी केलें पाहिजे, या भावनेने हा ग्रंथ लिहिला असल्याचें लेखकाने प्रस्तावनेंत नमूद केलें आहे. प्रा. गोडबोले अनेक वर्षे हिंदीभाषी प्रांतांत राहिलेले असल्यामुळे हिंदी भाषा त्यांना मातृभाषेसारखीच आहे. मराठी वाङ्मयाचाहि त्यांचा व्यासंग चांगला आहे हें त्यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या ' मराठी कादंबरी – तंत्र आणि विकास ' या ( प्रा. बापट यांच्या सहकार्याने लिहिलेल्या ) ग्रंथावरून दिसून येणारें आहे. अर्थात् प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याचा त्यांचा अधिकार अविवाद्य आहे.

सुमारें दोनशें पानांत समग्र मराठी वाङ्मयाचा इतिहास सांगितला असल्यामुळे तो अगदी त्रोटक झाला असून त्याचें स्वरूप केवळ परिचयात्मक होणें अपरिहार्य आहे. थोड्या अवकाशांत एखाद्या भाषेचा समग्र इतिहास सांगण्याचें काम एकप्रकारें कठीण होऊन बसतें. ज्या महत्त्वाच्या घटनांचें किंवा व्यक्तींचें विवेचन विस्ताराने करावयास पाहिजे त्यांच्या विवेचनाचा संकोच करावा लागतो व तसें करण्यांत त्यांच्या बाबतींत अन्याय होण्याचा संभव असतो. प्रा. गोडबोले यांस ही आपत्ति भासली असल्याचें स्पष्ट दिसतें. मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतील कोणतीहि महत्त्वाची घटना किंवा प्रवृत्ति, तसेंच महत्त्वाचे लेखक यांचा उल्लेख त्यांनी वगळला नाही हें खरें. परंतु त्यांचा परामर्ष घेतांना आपल्या लेखणीला अवकाशाचें बंधन आहे या गोष्टीची त्यांस वारंवार जाणीव होत आहे हें उघड दिसतें. प्राचीनांपैकी ज्ञानेश्वर- एकनाथांच्या वाङ्मयीन कार्याची सामाजिक पार्श्वभूमि अधिक स्पष्ट व्हावयास

पाहिजे होती. अर्वाचीनांपैकी अव्वल इंग्रजींतील लोकहितवादींचें वैशिष्ट्यपूर्ण कार्य, व पुढील केशवसुतांची काव्यविषयक कामगिरी, यांस अधिक अवकाश देता आला असता तर बरें झालें असतें. होतां होईल तों कोणत्याहि लहानमोठ्या लेखकाचा उल्लेख राहून जाऊं नये अशी लेखकानें खबरदारी घेतली आहे; परंतु हाच एकप्रकारें दोष झाला आहे. मराठी वाङ्मयाचा थोडक्यांत परिचय करून द्यावयाचा हा हेतु दृष्टीपुढे ठेवल्यानंतर त्यांतील महत्त्वाच्या विचारधारा व प्रवृत्ति यांजवर भर द्यावयास पाहिजे. परभाषिकांस लेखकांच्या यादीशीं विशेष कर्तव्य नसतें; दहाबारा वर्षांपूर्वी प्रि. भाटे यांनी इंग्रजींत लिहिलेल्या मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा ग्रंथ असाच यादीवजा झाला आहे. अर्थात् भाटे यांचा ग्रंथ अत्यंत गबाळपणें लिहिलेला असून त्यांत शेकडों चुका आहेत. गोडबोले यांच्या ग्रंथांत ठाकठीकपणा असून तो परिश्रमपूर्वक लिहिलेला आहे व एखाददुसरें विवाद्य स्थळ सोडल्यास तो प्रायः निर्दोष आहे. प्रो. गोडबोले यांचा हिंदी वाङ्मयाशीं चांगला परिचय असल्यामुळे कित्येक ठिकाणीं मराठी व हिंदी वाङ्मयांतील विशिष्ट प्रवृत्ति, वाङ्मयप्रकारांचा विकास, इत्यादिकांची तुलना करतां आली आहे, व ती हिंदी भाषिकांस निःसंशय मार्गदर्शक होईल.

अ. म. जोशी

**चित्रशाळा**— [ ले० नाना जोग, प्रका० मनोहर ग्रंथमाला, टिळकरस्ता, पुणें २, मूल्य दीड रु. ]

**सोन्याचे देव**— [ ले० नाना जोग, प्रका० पां. रा. ढमढेरे, सदाशिव, पुणें २, मूल्य दीड रु. ]

मराठी नाट्यवाङ्मयांतील रांगणेकर प्रणीत 'तेंच तें' तंत्र व मंत्र वाचून कंटाळलेल्या वाचकास या वर्षांत अधिक विचारगर्भ व नाविन्यमय नाट्यवाङ्मय पुरविण्याचें कार्य नाना जोग यांच्या 'चित्रशाळा' व 'सोन्याचे देव' या दोन नाटकांनी केलें आहे. पाश्चात्य नाट्यवाङ्मयाच्या वाचनानें व इब्सेन, शॉ, सिंज प्रभृति नाटककारांच्या नाट्यवाङ्मयांतील तजेलदार विचारधारांनी तन्मय होणाऱ्या आमच्या सुबुद्ध वाचकाला आजच्या मराठी नाट्यवाङ्मयानें संपूर्ण निराश केलें असतांना नाना जोग यांच्या दोन नाटकांनी या वर्षांत ती निराशा झडझडून जाण्याचा इशारा दिला असल्यास नवल नाहीं.

'चित्रशाळा' हें नाटक म्हणजे कलावंत व त्याची कला याविषयींचें नितांत रम्य पण तितकेंच सत्यवादी शास्त्रीय भाष्य होय. घराच्या चार भिंतींत चित्रशाळा सुरू करून स्वप्नरंजन करीत चित्रें रंगविणारा कलावंत 'प्रकाश' हा आजच्या या निर्जीव पण भांडवलशाहीच्या चाकोरींत सूक्ष्म दृष्टि न मिळाल्यामुळे काल्पनिक मनोराज्यें उभारणाऱ्या रुद्प्रवृत्त पण भोळसट कलावंतांचा प्रतिनिधि आहे. भगिणीच्या पार्टीतल्या खराट्याबरोबर हंसत खिदळणारें सुंदर बालक त्याच्या कलादृष्टीला एक आकर्षक साधन ( मॉडेल ) वाटतें. पण व्यवहारी जगाच्या वाळवंटांत, प्रखर अर्थवादाच्या तडाख्यांत त्या बालकाचा भावी काल, त्याचें जन्मदारिद्र्य व कर्मदारिद्र्य त्याच्या दृष्टीसमोर येत नाहीं. त्या बालकाच्या वरपांगी सौंदर्याच्या तकलादी पूजनानें समाजांतील विषमता नष्ट होणार नाहीं. कलावंत हा वरवरच्या सांकेतिक सुंदर मूल्याचा भाष्यकार बनून चालणार नाहीं तर सत्ता व संपत्ति या दोन प्रभावी

शक्तींनी व्यापून टाकलेल्या यंत्रप्रधान जीवनांतील नीरसतेचें कार्यकारण उलगडवून दाखवणारा, निर्मळ सत्याकडे निर्लोभ दृष्टीने व सूक्ष्म बुद्धीने बघणारा जीवनोन्मुख कलावंत आज हवा आहे ही या नाटकांतील तात्त्विक भूमिका आहे.

नायक प्रकाश जरी तकलादी सौंदर्यवादी असला तरी तो संपूर्ण मेल्या मनाचा नाही. सामाजिक जीवनाचीं मूल्यें अंतर्मुख दृष्टीने हेरून तीं प्रसंगोपात्त उघड करून दाखविणारी 'शोभा' ही प्रकाशाची पत्नी आहे आणि भांडवलशाहीमुळे नागवला जात असतांना शरण न जातां उलट तेजस्वीपणानें उत्तर देणारा गोविंद हा मध्यम वर्गीय कामगार या नाटकांत आला आहे. या दोन्हीं पात्रांच्या आचार-विचारांचा परिणाम निरनिराळ्या प्रसंगांच्या निमित्ताने प्रकाशवर होतो. स्तुति व पैसा यांच्या मोहक जालांत सांपडून आपली कला ही भांडवलशाहीकडून राबवली जाऊन अखेरीस इच्छा नसूनहि आपणच कामकरी लोकांचे शत्रू ठरतों हें कटु सत्य त्याला कळतें; तो स्वप्नरंजनांतून बाहेर येतो व 'भांडवलशाहीच्या जुलुमाविरूद्ध जिथे जिथे क्षोभ सळसळत असेल तिथे जाईन–त्या क्षोभाने खवळलेल्या माझ्या रक्तांत-उज्ज्वल मानवतेच्या त्या ठिणगीचें चित्र पुरें करीन' अशी घोषणा करतो. कलावंत मग तो साहित्यिक असो, नर्तक असो, चित्रकार असो पण जर त्याला आपली कला ही नीरसता व असत्य यापासून जिवंत व वास्तव ठेवायची असेल तर पुरोगामी जीवनमूल्यें वास्तवतेच्या दृष्टीने त्यांनी आत्मसात केलीं पाहिजेत. जीवनाशिवाय कला ही थट्टा आहे– प्रेतावरील उसना साजशृंगार आहे.

प्रकाश, शोभा आणि गोविंद या तीन प्रमुख पात्रांच्या भोंवती हें नाट्य विणलें आहे. या पात्रांच्या जीवनांतील घटना रंगविण्यापेक्षा त्यांच्या मनोवृत्तींतील आंदोलनें रंगविण्याकडे नाना जोगांनी सहेतुक लक्ष पुरविलें आहे. उथळ घटना व कृत्रिम भावनांची कारंजीं किंवा भाषेचा नखरा यांपेक्षा वैचारिक द्वंद्वें मानसशास्त्रीय विवेचनाने रंगविण्याचा नवनाट्याचा संकेत येथे आढळतो. भांडवलशाही व दलितशाही आणि त्यांचे मूर्ख व सुशिक्षित हस्तक यांचाहि उपयोग साक्षेपाने जोगांनी केला आहे.

'सोन्याचे देव' हें नाटक चित्रशाळेनंतर सहाच महिन्यांत प्रसिद्ध झालें. आजची राजकीय व सामाजिक परिस्थिति, अर्थशास्त्र जाणणाऱ्या व्यापारी वर्गानें चालवलेला काळाबाजार व या काळ्या बाजाराला प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष उत्तेजन देणारे मार्ग यांचें खुसखुशीत चित्र या नाटकांत आलें आहे. सोन्यालाच देव मानणारा व्यापारी वर्ग व स्वतःला अहिंसक गांधीवादी म्हणवून घेणाऱ्या पुढाऱ्यांकडून होणारी काळ्याबाजारवाल्यांना मदत प्रथम रंगवून नंतर या तीव्र जीवनकलहांत ह्या काळाबाजारवाल्यांच्या भस्मासुराचा वेळींच वध न केल्यास सर्व समाज रसातळाला गेल्याशिवाय रहाणार नाही हें सूचित केलें आहे.

गांधीवादी भाऊसाहेब, त्यांची प्रेमवेडी मुलगी प्रेमा आणि भाऊसाहेबांच्या गांधीवादाच्या व प्रेमाच्या प्रेमभावनेच्या पिंडीस वरकरणीं मिठी घालून हत्या, लूटमार, काळाबाजार चालविणारा भाऊसाहेबांचा सुशिक्षित जामात भालेराव या तीन पात्रांच्या भोंवती मुख्य नाटक रंगविलें असलें तरी त्यांत नाट्यात्मकता आणण्यास 'कोरके, शशी व तिचा प्रियकर साम्यवादी सबनीस' हीं उपकथानकाचीं पात्रें उपयोगी पडतात. काळाबाजार नीट चालावा या अंतःस्थ उद्देशाने भाऊसाहेबांच्या डोळ्यांत धूळ टाकून प्रेमा व भालेराव यांच्या लग्नसमारंभांत हजारों रुपये किमतीचे अहेर देणारे भांडवलशाही वृत्तीचे मगनलाल व रतनलाल रसोत्कटता निर्माण करण्यास हातभार लावतातच.

भाऊसाहेब हे सत्य, अहिंसा, सदाचरण इत्यादि सर्व सात्त्विक गुणांनी मंडित आहेत. एका दृष्टीने ते गांधीजींचे पट्टशिष्य वाटावेत असे आहेत. परंतु भालेरावाच्या कावे-बाजपणाला ते बळी जातात. दुबळा गांधीवाद हा पापी मनोवृत्तीला पोषक कसा ठरतो याचें चित्र भाऊसाहेब व भालेराव यांतून प्रकट केलें आहे. व्यवहारी वास्तववादी जग सात्त्विक किंवा राजस स्वरूपापेक्षा तामसी वृत्तींचें आहे. आणि त्याचमुळे अतिचांगुलपणा हा गुण ठरण्यापेक्षा दोषरूपच ठरण्याचा धोका निर्माण होतो. या जगांत वागायचें तर ' शठं प्रति शाठ्यं ' असलें पाहिजे. या दृष्टीने शशी व सबनीस ही जोडी आपल्या डोळ्यां-समोर तुलनेने उभी राहील. काळा बाजार उघड्यावर आणणारा साम्यवादी तरुण सबनीस हाच दुबळ्या भाऊसाहेबांपेक्षा खरें समाजकल्याण साधूं शकेल असा रोख या नाटकांतील घटनांचा आहे. आजच्या बुद्धिवादी, वर्गकलह नष्ट करणाऱ्या निःस्वार्थी तरुणांचा प्रतिनिधि म्हणून सबनीस रंगविला आहे. भालेराव हा बुद्धिवान् खरा पण त्याची नजर स्वार्थी आहे. धायबलचा आधार घेऊन बुद्धिभ्रंश करणाऱ्या सैतानाचा नवा सुशिक्षित अवतार म्हणजे भालेराव ! नाटकांत तो खलपुरुष असून राक्षसी महत्त्वाकांक्षेचा हिरण्यकश्यपुच आहे. भाऊ-साहेबांना दुरुत्तरें करण्याइतका कृतघ्न, प्रेमाची प्रतारणा करण्याइतका कुटिल, सबनीसाच्या खुनाचा घाट जमविण्याइतका कृष्णकारस्थानी आणि ऐन वेळीं सरकारी अधिकाऱ्याचे हातांत सोन्याचा देव लांच देणारा हा ' बनेल ' गृहस्थ आहे. बुद्धि व वक्तृत्व यांचें साह्य त्याला मिळालें आहे.

अशा आर्थिक कोंडींत जग सांपडलें आहे. सोन्यावर स्वामित्व गाजविणारी आणि समाजांत कलह माजविणारी आसुरी शक्ति हिरण्यकश्यपुसारखी मदोन्मत्त झाली असतांना, तिला नष्ट करण्यासाठी माणुसकी, पौरुष आणि निसर्गाचा निर्घृण न्याय यांनी एकत्र येऊन नारसिंहाचा अवतार घेतला पाहिजे.

ही भूमिका अत्यंत नाट्यात्मकतेने या नाटकांत रंगविली आहे. नाट्यपरीक्षणाचे तांत्रिक नियम लावून कथा, व्यक्तिरेखन, भाषा या घटनांचें विवेचन करण्यापेक्षा जोगांच्या नाट्यनिर्मितीच्या भूमिकेचेंच नवें मूल्यमापन करणें श्रेयस्कर ठरेल. आणि या दृष्टीनें बघतां लौकिक गोष्टींना धुडकारून देऊन, समाजजीवनांचे वास्तववादी दर्शन करून देणारीं आणि वेळोवेळीं वरपांगी रूढ जीवनमूल्यांची थट्टा करून मानव्याला उपयुक्त ठरणारीं वैचारिक मूल्यें निर्भीडपणें मांडण्याचें नाट्यरूपी साधन जोगांनीं उत्तम रीतीनें वापरलें आहे. क्षणिक मनोरंजनापेक्षां शाश्वत वास्तवदर्शनाने विचारांना जागृत करण्याचें कार्य मराठी नाट्यवाङ्मयांत जोगांनी यशस्वीपणें केलेलें आहे.

**म. वि. फाटक.**

**डॉ. बेझंट चरित्र** --- [ लेखक - रा. स. भागवत. प्र० म. ग्रं. भांडार मुंबई, मू. ५ रु. ]

महाराष्ट्रांतील थिऑसफी पंथियांतील एक प्रमुख श्री. रा. स. भागवत यांनी डॉ. बेझंट यांच्या चरित्रांतील अनेक आश्चर्यकारक व अनपेक्षित गोष्टी सामान्य माणसांना नीट कळाव्या या हेतूने हें चरित्र लिहिलें आहे. एका भाविक भक्ताने अव्याज भक्तीनें प्रेरित होऊन गुरुम-हिमा वर्णावा असाच प्रकार या चरित्रांत अथपासून इतिपर्यंत असल्यामुळे चरित्रवाङ्मयाच्या

तंत्राचा अभाव पुष्कळदा या पुस्तकांत जाणवतो. आत्मनिष्ठतेचा अभिनिवेश मोठ्या प्रमाणांत आविष्कृत झाला आहे. डॉ. बेझंट या महनीय व्यक्ति होत्या, बुद्धिमती होत्या, त्यांचा उद्योग अचाट व अंगीकृत कार्यांतील धडाडी वाखाणण्याजोगी होती असें आमचेंहि मत आहे, पण हिंदुस्थानांत होऊन गेलेल्या महनीय व्यक्तींत या श्रेष्ठतम होत्या असें सुचविण्याचा लेखकाचा आग्रह वस्तुनिष्ठ दृष्टीच्या वाचकाला पटणार नाहीं. लेखकाने न्यायमूर्ति रानडे, लोकमान्य टिळक, आगरकर, गोखले ( पृ. ८६ – ८७ ) इत्यादिकांबरोबर चरित्रनायिकेची केलेली तुलना व सूचित केलेले निष्कर्ष तर्कनिष्ठतेला सोडून आहेत. चरित्राशीं ज्याचा बिलकूल संबंध नाहीं असें लेखन 'राजयोगाचा अभ्यास' या प्रकरणांत आलें आहे; याशिवाय 'हिंदी राजकारणांतील धोरण' या प्रकरणांतील लेखकाचें निवेदन अस्थानीं आहे असेंच म्हणावें लागतें. या प्रकरणांतील मजकुराने डॉ. बेझंट श्रेष्ठ ठरत नाहीतच; उलट सामान्य वाचकांच्या मनांत त्यांच्याबद्दल विपरित ग्रह होण्याचा संभव फार आहे. थिऑसफीच्या अनुयायी वर्गाला कदाचित् लेखकाचीं मतें पटण्याजोगीं असतील, पण सर्वसामान्य वाचकाला प्रस्तुत चरित्र म्हणजे नवीन धर्तीवर लिहिलेलें एक पुराण आहे असें वाटण्याचा संभव अधिक. असें असलें तरी हें पुस्तक आमच्या तरुणांनी अवश्य वाचावें. एका परकीय बाईने हिंदुस्तानांत येऊन केवढा प्रचंड उद्योग केला, तो उद्योग करतांना केवढीं मोठालीं संकटें पुढे उभीं राहिलीं, सर्व दुःखाचें मूळ म्हणजे राजकीय दास्य हें लक्षांत आल्यावर या बाईनी राजकारणांत कशी उडी घेतली; त्याचा परिणाम काय झाला या सर्व गोष्टी वाचनीय व उद्बोधक आहेत.

काश्यप

**मानस-शास्त्र-प्रवेश**— [ ले० प्रि. शरयू बाळ व प्रा. वा. दा. गोखले, प्रका० आर्य संस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २. मूल्य रु. ५. ]

मानसशास्त्र-प्रवेशाचा हेतु या शास्त्राच्या सर्वसाधारण स्वरूपाची रूपरेषा दाखविण्याचा आहे. 'बालमानसशास्त्र' 'शरीर मानसशास्त्र' 'विकृतांचें मानसशास्त्र' इत्यादि ज्या मानसशास्त्राच्या विविध शाखा आहेत त्यांतील तपशीलांत न शिरतां या शास्त्राची व्याप्ति व मर्यादा स्थूलमानाने दिग्दर्शित करण्याचा लेखकांचा हेतु सफल झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाही. दोन्ही लेखक अध्यापन व्यवसायांतील असल्यामुळे अर्थातच विवेचनांत थोडा शैक्षणिक कल दिसतो. पण त्यामुळे ग्रंथाच्या उपयुक्ततेला बाध न येतां तो अधिक उद्बोधक झाला आहे.

ग्रंथाचे दोन भाग केले असून पहिला भाग सर्वसाधारण मानसशास्त्रांत मोडणाऱ्या विषयांच्या ऊहापोहास वाहिलेला आहे. तर दुसऱ्यांत या शास्त्रांतील विविध वाद व वादांगें यांचा परिचय करून दिला आहे.

अभ्यासविषय समजावून देतांना नीतिशास्त्राचा व मानसशास्त्राचा दृष्टिकोण यांमधील भेद व युक्तायुक्ततेची विचारणा न करितां मानवी कृतीमागील हेतु व विकार यांचा शोध निर्विकल्पपणें करण्याची वास्तववादी वृत्ति यांचें विवेचन ऋजु व स्पष्ट झालें आहे. पण मानवी कृतींची उपपत्ति लावून विकृतींत ही पद्धत कशी असू शकते हें दाखवून देऊन मानवी स्वभावाचें ज्ञान व आत्मज्ञान मानसशास्त्र करून देतें हा मुद्दा स्पष्ट व्हावयास पाहिजे होता.

मनोव्यापारांचें बाह्य स्वरूप प्रगट करणारें शरीरयंत्र, सहजप्रवृत्ति व भावना, अनुवंश व परिस्थिति, अवधान व अभिरुचि, सूचना, सहानूभूति, अनुकरणादि सामान्य प्रवृत्ति, इत्यादि विषयांचें समालोचन समर्पक असून त्यांत अतिसंक्षेप व अतिविस्तार हे दोन्ही दोष कौशल्याने टाळलेले दिसतात. व्यक्तिविकासाचें विवेचन मात्र अपूर्ण वाटतें. व्यक्तिमत्त्वाचें परिणत स्वरूप (Personality) व त्याचे विविध पैलू यांच्या दिग्दर्शनाची भर आवश्यक होती. तसेंच ज्ञानग्रहणाचें विवेचन जरी सुबोध व सविस्तर असलें तरी त्याला अनुशीलन( Habit ) कौशल ( Skill ) व अध्ययन ( Learning ) यांच्या उपपत्तीची जोड हवी होती. इतर विषयांचें विवेचन समुचित असून पहिल्या भागांतील अठरा प्रकरणांवरून मानसशास्त्राच्या सर्व साधारण स्वरूपाचें यथार्थ आकलन होतें. विशेषतः ठिकाठिकाणीं अद्ययावत् प्रयोगांची जी माहिती लेखकांनी दिली आहे तीवरून मानसशास्त्र म्हणजे केवळ पुस्तकी विद्या नसून स्वाभाविक व मुद्दाम घडवून आणलेल्या अनुभवांवर आधारलेलें खरेंखुरें शास्त्र आहे याची खात्री पटते.

विविधमतप्रणालींच्या विवेचनाचा दुसरा भाग हें या ग्रंथाचें उल्लेखनीय वैशिष्ट्य होय. विषयाच्या स्वरूपामुळे असो अथवा ग्रंथकारांच्या तादात्म्यामुळे असो पण हा दुसरा भाग पहिल्या भागापेक्षा प्रतिपादनाचा ओघ व भाषेची सफाई या दोन्ही दृष्टींनी सरस वाटतो. चारी वादांचें समालोचन सुबोध व आकर्षक झालें असून त्यांच्या परिशीलनाने मानसशास्त्र म्हणजे एक मर्यादित क्षेत्र नसून स्वतंत्र बुद्धीने केलेल्या संशोधनाला त्यांत विशाल अवसर आहे याची जाणीव होते. व ही जाणीव प्रतिभावन्त अभ्यासकांच्या बुद्धीला इष्ट चालना देईल असा भरंवसा वाटतो.

मानसशास्त्र व मानवी व्यवहार यांच्या परस्पर संबंधाचें विवरण मात्र फार औपचारिक भासतें. कारखाने, दवाखाने, न्यायालयें इत्यादि स्थानांत मानसशास्त्राचा उपयोग होणार नाही असें नाहीं, किंबहुना तो होणें फार इष्ट आहे. पण त्याचा अधिक प्रभावी वापर आपल्या दैनंदिन व्यवहारांत झाला पाहिजे. पतिपत्नीमधील विकोप, पितापुत्रांतील वैमनस्य, मित्रांमधील गैरसमज, किंबहुना सहकारी लेखकांमधील बेबनाव इत्यादि अनेक वैयक्तिक शल्यें मानसशास्त्राच्या मात्रेने ( अथवा मंत्राने ) सहज दूर होऊं शकतील. आपल्या सर्वच सामाजिक घडीची व वागणुकीची पुनर्रचना मानसशास्त्राच्या ज्ञानाने कशी करतां येईल याचें स्थूल दिग्दर्शन शेवटच्या प्रकरणांत आवश्यक होतें.

पण हीं न्यूनें जमेस धरूनहि लेखकांनी आपलें अंगीकृत कार्य कौशल्याने व यशस्वीपणें पार पाडलें आहे असें निस्संदिग्धपणें म्हणतां येईल. आपल्या ज्ञानाच्या परभृतत्वाची कबूली लेखकांनी आरंभींच दिली आहे. पण शास्त्रीय विषयांत ज्ञानाच्या नवनिर्मितीला जरी अधिक महत्त्व असलें तरी त्याच्या प्रतिपादनाचें स्थान गौण नाही. मराठींत तर आज शास्त्रीय विषयावरील सुबोध ग्रंथांची तीव्र उणीव आहे. मानसशास्त्रावर मराठींत लिहिणें किती अवघड आहे हें लिहावयास बसल्याशिवाय कळत नाही. असें अवघड काम पार पाडून मानसशास्त्रावरील मराठी ग्रंथसंपदेंत बहुमोल भर घातल्याबद्दल प्रि. बाळ व प्रा. गोखले अभिनंदनास पात्र आहेत.

—(प्रा.) रा. म. मराठे

अनुक्रमणिका

**श्रीसंजीवनीहरण** (काव्य)—कवि—विनायक गोविंद साठये प्रका०—प्रमुख, स्नेहसंवर्धक संघ, मिरज. किंमत तीन रु०

प्रस्तुत काव्य मीं वाचून पाहिलें असून मला तें आवडलें आहे. प्रमुख पात्रांच्या सूक्ष्म मानसिक हालचाली त्यांत सुरेख चित्रित झाल्या आहेत. त्यांत नवीन प्रसंग व संभाषणें, मुख्य कथानकाला धक्का न लावतां, घातलीं आहेत, त्यांत कवीची कल्पकता चांगलीच व्यक्त होते. कवीची कल्पनाशक्ति तरल असून तिला अपन्हुति अलंकाररूपाने प्रकट होण्याची विशेष आवड दिसते. निसर्गवर्णनें त्या त्या प्रसंगाच्या उत्कट भावनांनी —विचार—विकारांनी रंगलेलीं आहेत ही गोष्ट मला विशेष पसंत पडली.

काव्यांतली भाषा संस्कृतप्रचुर असली तरी बोजड व क्लिष्ट नाही. जुन्या कथानकाला हवी त्याप्रमाणे ती लवचिक व अर्थग्राहक आहे. संस्कृत महाकाव्यांचा फार चांगला संस्कार कवि मनावर झाल्याचा संतोषदायक अ ढळ पदोपदीं होतो. माझ्यासारख्याला हा विशेष फारच आल्हादकारक वाटेल हें निराळें सांगण्याची जरूरी नाही. प्राचीन मराठी कलाकवींचे कांही मनोहर विशेष सफाईने आत्मसात केले असल्याचे दिसतात.

आधुनिक कालांत जुन्या कथांचें पुन्हा कथन करण्यांत इतर हेतूबरोबर आधुनिक काळाशीं अनुसंधान समरसता हा हेतु मी मुख्य मानतों. प्रायः कोणतीहि महाभारत-रामायणोक्त कथा महाकाव्यास आधुनिक काळीं आधार म्हणून घ्यावयाची झाल्यास तिच्या तात्कालिक महत्त्वापेक्षा तिच्यांतील सार्वकालिक तत्त्वांकडे कवीचें लक्ष्य गेलें पाहिजे. ती सर्व कथा हें सार्वकालिक आणि नित्य मानवी जीविताचें प्रतीक (Symbol) व्हावयास पाहिजे. असें असेल तरच आजचा वाचक त्यांत अधिक रंगेल. याहि गोष्टीकडे कवीचें लक्ष थोडें बहुत आहेसें 'नमस्ते' या निवेदनावरून दिसतें. त्याचा अस्पष्ट आढळ, खुद्द काव्यांतहि क्वचित् होतो (पृष्ठ ३, १०१). पण जें काव्याबाहेर गद्यांत सांगितलें त्याचा समावेश अधिक स्पष्ट, वारंवार व लक्ष वेधेलसा कटाक्षाने करण्यांत आला असता तर फार बरें झालें असतें. अर्थात् हें सर्व करणें काव्याच्या ध्वन्यात्मक पद्धतीनेच करावयाचें असतें. रूक्ष उपदेशपरता किंवा व्याख्यानबाजी तेथे नसावी, हें सर्वसंमतच आहे.

असो. खरे, साधुदास, वि. वा. भिडे इत्यादि संस्कृत व प्राचीन मराठी काव्यसंप्रदायाला अनुसरून काव्यरचना करणाऱ्या कवींमध्ये श्री. साठे यांची श्रेणी या महाकाव्यामुळे बरीच वरची लागेल. या सत्काव्य-निर्मितीबद्दल कवीचें हार्दिक अभिनंदन करतों.

**के. ना. वाटवे.**

**शारदिनी**—[ कवि : वा. पु. दामले. प्रका० एन्. के. पब्लिशिंग हाऊस, पुणें २. किंमत २॥ रु. ]

नवसामर्थ्याचा आविष्कार करीत मराठी कविता नवरूप धारण करण्याच्या संधिकालीं वावरत असतां प्रसिद्ध झालेला हा संग्रह मात्र जुन्या जमान्यांतच मोडण्याजोगा आहे. यामध्ये विविध विषयांवर लिहिलेल्या वृत्तात्मक कविता कवीने संग्रहित केल्या आहेत. शार्दूलविक्रीडित, मंदाक्रांता, वसंततिलका इ. वृत्तें सफाईदार रीतीने कवि लिहितो. बाह्यरचनेंत प्रसाद तद्वत् अंतर्गत गुणांत एक प्रकारचा निरागसपणा आढळतो. मात्र भावनोत्कट-

तेपेक्षा बौद्धिक कल्पनाविलासाकडे कवीचें लक्ष अधिक असावेसें वाटतें; व भावकाव्याच्या सृष्टींत जी आर्तता, उत्कटता, व सहजता अपेक्षित असते ती येथे विरलत्वानेच आढळते. मात्र हा दोष कवीच्या विनोदपर काव्यांत गुण ठरला आहे. आणि त्याची ही रचना चांगली उतरली आहे. सुभाषितांजलींतील, भाषांतरित असली तरी, सरस वाटणारी रचना अवश्य उल्लेखनीय आहे. संस्कृतच्या तोडीस तोड अशीं कांही भाषांतरें कवीने केलीं आहेत. भवभूतीच्या प्रसिद्ध, " ये केचिदिह नः -- " इ० श्लोकांचें भाषांतर, 'अव्हेरिलें मम सुकाव्य उगाच ज्यांनी, त्यांना कळो ! रसिक मीहि तयां न मानी, माझा कुणीतरि निघेल समानशील, कालास अंत नच, भूमि असे विशाल !' असें केलें आहे. इतर भाषांतरें व 'संशयशुक्तिमाला' ही दीर्घ कविताहि वाचनीय आहे. कित्येक कविता मात्र अगदीच प्रासंगिक आहेत. कवीची जीवनप्रेमी दृष्टि आणि खेळकर वृत्ति हीच या संग्रहांत अधिक आकर्षणीय वाटते. श्री. दामले हे " एक हौशी कवी " आहेत, असें परिचयकार श्री. प्र. के. अत्रे यांनी त्यांचें वर्णन केलें आहे व वाचक त्याशीं सहमतच होतील.

वि. म. कुलकर्णी

**समग्र राधारमण**— [ कविः श्री. राधारमण. प्रकाशकः श्री. चिं. कृ. लिमये, ३।११ अग्रवाल नगर, व्हीन्सेंट रस्ता, मुंबई १९ मूल्य ७ रुपये ]

१८८५ ते १९२० हा कालखंड म्हणजे मराठी कवितेचा क्रांतिकाल होय असें सामान्यतः समजलें जातें. केशवसुतांनी ज्या नव्या वळणाच्या काव्यरचनेला आरंभ केला तिने याच कालांत मूळ धरलें आणि मराठी कवितेने आपली पूर्वपरंपरा सोडून अनेक नव्या गोष्टींचा अंगिकार केला. विशेषतः भावगीत हें जें कवितेचें यथार्थ क्षेत्र तें या कालांतल्या कवितेने अचक आत्मसात् केलें आणि त्यामुळे स्वाभाविकच तिच्या प्रगतीची कक्षा विस्तृत झाली. केशवसुत व त्याचे समकालीन यांची कविता या दिशेने वाटचाल करीत असतांनाच मराठी कवितेंतील पूर्व परम्पराहि आपापल्या मार्गाने पुढे जाण्याचा यत्न करीतच होत्या. यांतली प्रमुख परंपरा पंडिती वळणाच्या कवितेची होती. विठ्ठल भगवंत लेंभे, विद्याधर वामन भिडे, लक्ष्मणशास्त्री लेले, बाळकृष्ण अनंत भिडे इ. मंडळी याच परंपरेंतली. ही बहुतेक मंडळी चांगली व्युत्पन्न असून संस्कृत महाकाव्य-रचनेचा आदर्श त्यांच्या नजरेसमोर होता. कथनपर किंवा आख्यानक रचना, छन्दःप्रभुत्व, पांडित्यनिदर्शन अशीं कांही ठळक वैशिष्ट्यें यांच्या कवितेंत दिसून येत. कवि राधारमण म्हणजेच कै. कृष्णाजी पांडुरंग लिमये हेहि याच परंपरेंत व कालखंडांत वावरून गेलेले कवि होत.

कवि राधारमण हे एक व्यासंगी व रसिक संस्कृत-शिक्षक म्हणून प्रसिद्ध होते. या पुस्तकांतील त्यांच्या संबंधीच्या आठवणी वाचून पाहातां ते प्रथमदर्शनीं करड्या वृत्तीचे वाटले तरी खरोखर प्रेमळ वृत्तीचे, स्वाभिमानी, जहाल पंथीय राष्ट्रवादाची तळमळ असलेले गृहस्थ होते, अशी खात्री पटते. टिळकांविषयी त्यांना पराकाष्ठेचा आदर असून त्यांच्या जहाल राष्ट्रवादी राजकारणाची छाप त्यांच्या मनावर संपूर्णपणें पडलेली दिसते. संस्कृतचा गाढ व्यासंग, पंडिती परंपरेचें आकर्षण व जहाल राष्ट्रीय विचारांचा आविष्कार या सार्‍यांचा समन्वय म्हणजेच त्यांच्या काव्याचें स्वरूप होय.

म. सा. प. (२२-४-६)

या पुस्तकांतील त्यांच्या दीर्घ रचनेपैकी अपुरेंच राहिलेलें 'किरातार्जुनीया'चें भाषांतर त्यांच्या भारवीवरील प्रेमाचें द्योतक आहे, तर आरंभीचेंच ' कालचक्र-वर्णन ' कालिदासीय 'ऋतुसंहारा'ची आठवण करून देतें. ही प्रत्यक्ष उदाहरणें सोडून दिलीं, तरीहि त्यांची कल्पना रचना, अलंकार, भाषा, संकेत या सान्या कवितेच्या कमीजास्त महत्त्वाच्या अंगोपांगांवर संस्कृत वळणाचा रंग चढलेला आहे.

" भूपाल-सुत मग वदे ' निःसंशय मत्प्रियाच हे बाला
मत्पापभीरुमानस अभिलाषी अन्यथा कसे तिजला ? "

या सारख्या संस्कृतमधील प्रसिद्ध उक्तींचा आठव करून देणाऱ्या ओळी जशा या काव्यांत आहेत, तशाच केवळ संस्कृतच्या निकट परिचितालाच ज्यांतलें मर्म उमजेल अशा

"नृशंस शिशुपालही सदसदर्थवाची पदें
स्तवी तशिंच दूषवी छल-पटु प्रभूचीं पदें "

या सारख्या ओळीहि या काव्यांत सांपडतात. "गजासुरवध" या काव्याचे केवळ दोनच सर्ग लिहिले गेले आहेत; पण त्यावरुनहि हें काव्य थेट संस्कृत महाकाव्याच्या धर्तीवर कसें उतरलें असतें त्याचें चित्र सहज डोळ्यासमोर उभें राहातें. कथानकाच्या नाविन्यामुळे आणि प्रसन्न शैलीचा केवळ दोन सर्गांतहि प्रत्यय येत असल्याने-हें काव्य चांगलें झालें असतें असें वाटून-तें अपुरें राहिलें याची खंत वाटते.

कवि राधारमणांचा संस्कृतप्रमाणेंच मराठी कवितेशींहि चांगला परिचय होता. विशेषतः मोरोपंतांची

" सदा सुरसदायिनी, चरणचारुताधारिणी
सुवर्णपदशालिनी, विविधदैवताधारिणी "—

कृति त्यांना अधिक प्रिय होती. 'मोरोपंतांचा प्रभुद्रोह' या काव्यावरून त्यांच्या 'केकावली'च्या सूक्ष्म अभ्यासाची प्रचीति येते. पण या काव्याचें महत्त्व याहून अधिक आहे. केकावलींत परमेश्वराला उद्देशून मोरोपंतांनी कांहीं अनुचित शब्द वापरले आहेत हें कळल्यामुळे परमेश्वराच्या न्यायासनासमोर त्यांची चौकशी झाली. विरुद्ध पक्षाच्या वकिलांनी मोरोपंतांच्या काव्यांतून "न पावसि म्हणोनि मी म्हणतसे तुला आळशी " किंवा " भलें स्मरण जाहलें समर्थि कंसदासी करें " असे अनेक प्रत्यक्ष उतारेच काढून दाखवून मोरोपंतांना गुन्हेगार मानलें; मोरोपंतपक्षीय वकिलांनीं हे उतारे संदर्भरहित असल्याने ते दोषार्ह वाटतात असें सांगून त्यांचा बचाव करण्याचा यत्न केला; पण त्याचा उपयोग न होतां त्यांना शिक्षा झाली. अपीलहि झालें-पण वायां गेलें; आणि आपल्यावर अन्याय झालेला आहे, अशी खात्री असलेल्या मोरोपंतांना अखेर शिक्षा भोगावी लागली. हा नाट्यपूर्ण कथाभाग म्हणजे लोकमान्य टिळकांच्या जीवनांतील त्या सुप्रसिद्ध प्रसंगावरील एक सुरेख वक्रोक्ति होय. टिळकांच्या मृत्यूने शोकमग्न झालेल्या आर्यमातेचा विलाप जींत ग्रथित केला आहे ती ' आर्यमाताविलाप' व ही कविता या परस्परपूरक होत. या दुसऱ्या कवितेंत कित्येक श्लोकांची, चरणांची व शब्दांची सहेतुक पुनरावृत्ति करून राधारमणांनी आपली वक्रोक्ति उघड करून दाखविली आहे. राधारमणांच्या टिळकांवरील श्रद्धेचीं हीं दोन महत्त्वाचीं उदाहरणें होत.

' फडणीस - काव्य ' व ' महाराष्ट्र वीरादर्श काव्य ' ही राधारमणांच्या वेळीं लोकप्रिय झालेलीं त्यांचीं काव्यें आजच्या अभिरुचीस मानवणार नाहीत. त्यांतला ऐतिहा-

सिक किंवा राष्ट्रीय दृष्टिकोण शुद्ध स्वरूपाचा नाही, परंपराविषयक ममत्वाने तो गढूळ झालेला आहे. आणि असें होणें स्वाभाविकच होतें. तरीहि 'तत्कालीन देशाभिमानी लोकांच्या मनोवृत्तीचा परिचय करून घेण्याच्या दृष्टीने', प्रस्तावनाकार म्हणतात त्याप्रमाणे हीं, काव्यें आजहि वाचनीय आहेत, कारण कांही झालें तरी राधारमणांनी हीं काव्यें स्वदेशभक्ताच्या भूमिकेनेच लिहिलेलीं आहेत. त्यांच्या 'जहाल आणि मवाळ' या काव्याविषयी मात्र असें म्हणतां येत नाही, ही खेदाची गोष्ट आहे. यांत मवाळासंबंधी प्रगट केलेली मतें दूषित असल्याने उद्वेगजनक वाटतात.

या पुस्तकांत राधारमणांच्या स्फुट कविताहि संकलित केलेल्या आहेत. त्यांत संस्कृत-मध्ये लिहिलेलीं कांही स्तोत्रें आहेत, कांही उपदेशपर, बोधपर कविता आहेत आणि कांही वर्णनचमत्कृतीपूर्ण आहेत. पण या रचनेंत रमणीय असें फारसें कांही नाही.

कल्पनांची आणि त्या व्यक्त करणाऱ्या ओळींची पुनरुक्ति, शाब्दिक कोड्यांची आवड, किंवा "धरा धराया महती समान" या सारख्या शब्दचमत्कृति इ० कांही दोष जरी कवि राधारमणांच्या काव्यांत आढळत असले, तरीहि ओघवती शैली, ठाकठीक रचना आणि सर्व रचनेला व्यापून राहणारी औचित्याची जाणीव यामुळे जुन्या वळणाच्या कवितेच्या वाचकांना हें पुस्तक प्रिय होईल. नव्या मनोवृत्तीच्या वाचकांनाहि ऐतिहासिक दृष्टीने या काव्याचें वाचन करावें लागेल. या पुस्तकाची वाचनीयता आणखीहि एका कारणामुळे वाढली आहे, तें म्हणजे याला लाभलेली आचार्य भागवत यांची प्रस्तावना! आचार्यांनी या प्रस्तावनेंत काव्याच्या अन्तरंगासंबंधी आणि जिवंत काव्य, नवकाव्य व पुरोगामी काव्य यांच्या स्वरूपाविषयी प्रगट केलेले विचार जितके महत्त्वाचे आहेत, तितकीच राधारमणांच्या काव्याच्या निमित्ताने त्यांनी केलेली लोकमान्य टिळकांच्या राष्ट्रवादाची व कर्तृत्वाची मीमांसाहि मार्मिक आहे.

(प्रा.) कृ. व. निकुम्ब

---

## साभार स्वीकार—

१ मादाम मेरी क्युरि—ले. ग. वि. अकोलकर; प्रका. कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १॥ रु.

२ श्री. ज. स. करंदीकर यांचे निवडक लेख व निबंध—प्रका. आ. रा. भट, केसरी-कार्यालय, पुणें २; मूल्य ६ रु.

३ टिपरी पडघमूवर पडली (कादंबरी)—ले. मनमोहन नातू; प्रका. श्री. चव्हाण, हरिहर प्रेस, पुणें २, मूल्य पांच रु.

४ नियतकालिकें—प्रताप कॉलेज, अमळनेर; न्यू स्कूल, जुन्नर; आर. एम्. भट हायस्कूल, परळ. अजिंठा, एम्. जे. कॉलेज, जळगांव.

[ पान ३२ वरून पुढें चालूं ]

मनामधे त्याचा विकास होणें शक्य नव्हतें. त्यामुळेच त्यांच्या निर्याणानंतर त्यांचे अनेक शिष्य प्रशिष्य मस्तकावरला मणि नाहींसा झालेल्या अश्वत्थाम्याप्रमाणे भासत आहेत आणि 'महात्मा गांधी की जय' म्हणून गर्जना करीत आलेला समाज अगतिक होऊन कपाळाला हात लावून बसला आहे !

निसर्गातली अंदाधुंदी आणि माणसांतलें पशुत्व यांच्याविरुद्ध सतत युद्ध करणाऱ्या गांधीजींचा जीवनसंदेश तात्त्विकदृष्ट्या मनुष्यजातीला मोलाचा वाटत राहील हें सांगायला कशाला हवें ? पण तो पुस्तकांत अथवा एखाद्या आश्रमांत पडून राहायचा नसेल तर त्याची अंमलबजावणी होण्याकरिता विशिष्ट सामाजिक परिस्थिति आपण आधी निर्माण करायला हवी. हरेक प्रकारची कृत्रिम विषमता जिच्यांत जास्तींत जास्ती प्रमाणांत नाहीशी झाली असेल अशा समाजरचनेंतच गांधीजींचें तत्त्वज्ञान रुजूं शकेल. त्याचीं गोड फळें कधी ना कधी मिळण्याची शक्यता निर्माण होईल. या दृष्टीने गांधीवाद समाजवादाला पूरक आहे. पण जगाची किंवा जीवनाची नवी घडी बसवायला सद्यःस्थितींत तो पूर्णपणें असमर्थ आहे. समाजवादाची प्राथमिक तत्त्वें सुद्धा ज्या समाजाच्या पचनीं पडलेलीं नाहीत तिथे गांधीवाद यशस्वी होणें अशक्य आहे. पायावांचून मंदिर आणि मंदिरावांचून कळस उभारण्याचा हा चमत्कार प्रथमदर्शनीं कुतूहलजनक वाटला तरी अंतीं अयशस्वी होणार हें भविष्य वर्तवायला ज्योतिषाची मुळीच जरूरी नाही.

प्रा. पारीख म्हणतात त्याच मार्गाने यापुढें आपल्याला गेले पाहिजे. ते म्हणतात, ' नैतिकतेवर आधारलेलें जीवन निर्माण करण्याचा मार्ग म्हणजे लोकशिक्षणाचा मार्ग होय. गांधींच्या विचारसरणींत ऐहिक व नैतिक जीवन यांची सांगड घालण्याऐवजी ' ऐहिक ' नैतिकतेच्या कक्षेच्या बाहेर टाकण्यांत आलें. त्यामुळे जीवनांत नीतिमत्ता निर्माण होऊं शकली नाही यांत फारसें आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. '

ही नीतिमत्ता केवळ संयमाच्या उपदेशाने, ईश्वराच्या प्रार्थनेने किंवा संन्यस्त वृत्तीच्या मूठभर सेवकांच्या दर्शनाने निर्माण होणें शक्य नाही. मनुष्यांतल्या भलाईवर गांधीजींचा फार विश्वास होता. पण सामान्य मनुष्य सच्चा नाही आणि लुच्चाहि नाही. तो प्रवाहपतित आहे. यतिधर्म किंवा सेवाधर्म या गहन गोष्टी आहेत. या कानाने त्या तो ऐकतो व त्या कानाने सोडून देतो. मनुष्याचें जीवन केवळ भाकरीने पूर्ण होत नाही हें याला कळतें. पण जीवनांत प्रथम भाकरीची सोय झाली पाहिजे, मग आत्म्याची झाली तरी चालेल, असा त्याचा आजचा अट्टाहास आहे. तोंडावर कुठले तरी चार शिळेपाके तुकडे टाकूनहि त्याला आता संतुष्ट ठेवतां येणार नाही. लेविस ममफोर्ड म्हणतो तेंच खरें आहे. 'आजच्या जगाचे हें भोंक पडलेलें गलबत चालू वादळांतून निभावून न्यायचे असेल तर त्याच्यांत भरलेला माल समुद्रांत फेंकून द्यायची आपली तयारी पाहिजे.' सुखाच्या, संस्कृतीच्या, वैयक्तिक जीवनाच्या, समाजरचनेच्या ज्या ज्या कल्पना या पुढे निरुपयोगी ठरणार असतील त्यांचा त्यांचा तत्क्षणीं आपण त्याग केला पाहिजे. नवें जग आणि नवा मानव आपणहून कधीच निर्माण होणार नाहीत. तीं कष्टाने आणि कौशल्यानें, जीवननिष्ठेला विज्ञानाची जोड देऊन, घडविलीं पाहिजेत.

---

# इंन्द्रधनुष्य !

[ द्राक्षकन्या ]

ओसरला आता पिसाट वादळवात
उतरलें धरेवर ऊन कोवळें शांत
वाऱ्यावर खेळे गोड मृत्तिकागंध-
आकाश रंगवी इन्द्रधनूची कान्त !

स्वर्गांत अप्सरा रंग खेळती काय ?
वा खेळ खेळतां पदर उडोनी जाय ?
—हे सप्तरंग का बिंबित होती त्याचे
वा स्वर्गद्वारीं कमान ही कमनीय !

प्रतिनिधित्व करण्या किंवा इंद्रसभेंत
राष्ट्रांचे सगळया राजदूत ते येत
नवनव्या ध्वजांचे रुचिरवर्ण जे—त्यांच्या
आकाश-आयनीं छटाच अंकित होत !

जीवनीं आजवर किती वादळें आलीं
मी क्षिती न केली—हसण्यावारी नेली !
परि असंख्य अनुभव असे आजवर तुजला-
अन् म्हणून वाटे प्रीत आपुली जुळली !

लावण्य पाहुनी इंद्रधनुष्या तूझें
क्षण हलकें होई मम कष्टांचें ओझें
तुजकडे पाहतों पुन्हा पुन्हा का न कळे !
जणु गगनीं जीवित बिंबित झालें माझें !

या अथांग नीलाकाश-सागरावरतीं
रंगाचे तुझिया तरंग उठती-विरती !
संकल्प सुखाचे, आकांक्षा अभिलाषा—
जीवनांत माझ्या तेंवी स्फुरती-विरती !

मित्रा, तव दर्शन म्हणून जेव्हा घडतें
प्रेमाचें येतें भरतें—जीवन फुलतें !
क्षण व्याप-ताप विस्मृतींत जाती विलया—
अन् जीवन मजला हवें—हवेसें होतें !

इंदूर —अनंत पोतदार.

# जगदीशाची पत्रें

भावनगर ता. ३-३-५०

प्रिय शरद,

गेल्या पत्रांत सांगितलेली बरीचशीं पुस्तकें तूं संपवलेली आहेस. आतां पुढील हप्ता !

'**झंझावात**'चे लेखक श्री. रमणलाल व. देसाई ह्यांची ऐतिहासिक कादंबरी '**पहाडनां पुष्पो**' राजस्थानी वीर उदयसिंह ह्याच्या वीर जीवनाची कादंबरी आहे. त्यांचाच '**कांचन व गेरू**' नांवाचा १७ लघुकथांचा संग्रहहि बाहेर पडला आहे.

श्री. धूमकेतु ह्यांचे '**गुर्जरेश्वर**' तूं वाचलें आहेसच. त्याच्यापुढें श्री. चुनीलाल व. शाह ह्यांचे '**गुर्जरेश्वर**' जरा कमी दर्जाचें वाटेल हें उघडच आहे. दोन्ही पुस्तकें तुलनात्मक दृष्टीने वाचायला मी तुला सूचना करतों.

ग्रामजीवनाच्या निरूपणासाठीं प्रसिद्ध झालेले श्री. ईश्वर पेटलीकर ह्यांची '**काजळ कोटडी**' ही कादंबरी त्यांच्या इतर कादंबऱ्यांपेक्षा, विषय निराळा असल्यामुळें, चटकन् लक्ष वेधते. ४२ च्या लढ्यांत पुढाकार घेणारा एक क्रांतिकारी भावनाशील तरुण कॉंग्रेस-कार्यकर्त्यांच्या सांगण्यावरून स्वतंत्र भारताचा पोलीस म्हणून भरती होतो; पण त्याच्या सत्यनिष्ठेचा ताप जिरवणें पोलीस खात्याला शक्य नसल्यामुळें शेवटीं त्याला 'डिस्चार्ज' मिळतो, अशी कथा आहे. पोलीस लोकांच्या जीवनाचें यथार्थ अवगाहन श्री. पेटलीकर ह्यांनीं ह्या कादंबरींत केलें आहे.

त्यांचाच '**काशीनु करवत**' नांवाचा लघुकथांचा संग्रह नुकताच प्रसिद्ध झाला आहे.

श्री. विनोदिनी नीलकंठ ह्यांची '**कदलीवन**' नांवाची कादंबरी सामाजिक असून धनिक वर्गाच्या आलेखनाचा यथाशक्ति प्रयत्न लेखिकेनें केला आहे.

'काव्यविवेचन'चे लेखक श्री. डोलरराय मांकड ह्यांचे '**भगवाननी लीला**' अनुष्टुप छंदांतील सुंदर कथाकाव्य आहे. तर देशभक्तिप्रधान गीतें श्रीमती ज्योत्स्ना शुक्ल ह्यांच्या 'बंदीनां मुक्तगान' ह्या काव्यसंग्रहांत तुला पहायला मिळतील. श्री. निरंजन भगत ह्यांचे '**छंदोलय**' व श्री. दुर्गेश शुक्ल व श्री. वसंत अवसरे ह्यांचे '**झंकृति**' हे दोन काव्यसंग्रह वाचायला तुला आनंद वाटेलच.

मौलिक असें नाटक माझ्या नजरेस पडलें नाहीं. पण श्री. मधुसूदन कालेलकर ह्यांच्या 'उद्यांचे जग' ह्या नाटकावरून श्री. रश्मि पंचोळी ह्यांनीं १९४२ हें नाटक थोडाफार बदल करून लिहिलें आहे. त्याच्यावर कार्लें केपकच्या 'मदर' ची सुद्धा छाया आहे. तरी गुजरातींत स्टेजवर आणण्यासारखीं जीं थोडींफार नाटकें आहेत त्यांच्यांत भर तर निश्चित पडली आहेच.

अनुवादित असें साहित्य बरेंचसें आहे. श्री के. का. शास्त्री ह्यांनी '**कालिदासनां त्रण नाटको**' ह्या नांवांखाली 'मालविकाग्निमित्र,' 'विक्रमोर्वशीय', व 'अभिज्ञान शाकुन्तल' हीं तीन नाटकें अनुवादिलीं आहेत. 'मुद्राराक्षस'हि त्यांनीं अनुवादिलें आहे. बंगाली साहित्यांतून '**टागोरनां एकांकी नाटको**' श्री रमणिक दलालनीं, '**मरुभूमिमां**' (शरदेन्दु बन्दोपाध्याय) ' श्री. रमणिक मेघाणीनी, '**राजवला** (चारुचंद्र बन्दोपाध्याय) व '**शंखनाद**' (नरेशबाबू) श्री. रमणलाल सोनीनी आणि अनुरूपादेवीच्या 'मंत्रशक्ति' चा

अनुक्रमणिका

अनुवाद 'राधाराणी' नांवाने श्री. निर्मल कुमार ह्यांनी केला आहे. टागोरच्या नाटकाव्यतीरिक्त इतर सर्व कादंबऱ्या आहेत।

श्री. धूमकेतु ह्यांनी 'जिब्राननी जीवनवाणी' मधे जिब्रान रूपांतरित केला आहे. अर्थात् हें भाषांतरित किंवा अनुवादित नाही, आणि रुपांतर लेखकाच्या शैलीने झालेलें आहे.

राजेंद्रप्रसादची आत्मकथा 'मारी जीवनकथा' श्री. प्रभुदास गांधीनी अनुवादिली आहे. तसेंच वल्लभभाई, महादेवभाई, सरोजिनी नायडू वगैरे अनेक थोर व्यक्तींची जीवनचित्रें रेखाटणारे श्री. अं. ना. जोशी ह्यांचे 'राजाजी' नुकतेंच बाहेर पडलें आहे.

गुजरातचे प्रथम पंक्तीचे कवि आणि सध्यां अरविंद आश्रमाचे साधक श्रीसुंदरम् ह्यांनी 'अरविंद ने तेमनो आश्रम' आणि आश्रम संदेश हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केली आहेत. आश्रमाविषयक बरीचशी माहिती ह्यांनीं पुरविली जाते.

स्वातंत्र्यवीर सावरकर ह्यांचे 'भारतीय स्वातंत्र्यसंग्राम १८५७' (पुर्वार्ध आणि उत्तराध) व 'मारी जन्मठेप' हे गुजराती अनुवाद ह्यांचा उल्लेख वास्तविक गेल्या पत्रांत व्हायचा होता पण पुस्तकें थोडीशी उशीरा मिळाल्या कारणीं ह्या पत्रांत केला आहे.

सोरठी लोकसाहित्याचे संशोधक व पालकपिता श्री. झवेरचंद मेघाणी ह्यांचे चिरंजीव श्री. महेन्द्र मेघाणी ह्यांनी अमेरिकेंत वृत्तपत्राचें शिक्षण घेतल्यानंतर येथें गुजराती 'रीडर्स डायजेस्ट' 'मिलाप' मासिक सुरु केलें आहे हीं आनंदाची बातमी आहे. मराठींतही असल्या 'रीडर्स डायजेस्ट' ची जरूरी आहे असें माझ्यासारखे अनेकांना वाटत असेल. परिषदेने पुढाकार घेतल्यास हें कार्य फारसें जड होणार नाही असें मला वाटतें.

आतां थांबतों। मे महिन्यांत मुंबईच्या साहित्य संमेलनांत आपली भेट होईलच।

तुझाच
जगदीश.

---

## वरील पत्रांत उल्लेखिलेलीं पुस्तकें:—

(१) गुर्जरेश्वरः— गांडीव साहित्य मंदिर, सुरत. किं. रु. ४. (२) काजळ कोटडी- भारती साहित्य संघ, अमदाबाद. किं. रु. ३॥. (३) कदलीवनः— पद्म पाब्लिकेशन्स, मुंबई १ किं. रु. ३. (४) भगवाननी लीलाः— चारुतर प्रकाशन, वल्लभविद्यानगर किं. रु. १।. (५) छंदोलयः— इंद्रधनु बुक हाऊस, अमदाबाद, किं. रु १॥. (६) कालिदासना त्रण नाटकोः— गुर्जर ग्रंथरत्न कार्यालय, अमदाबाद, किं. रु. ४॥. (७) मुद्राराक्षसः— गुर्जर ग्रंथरत्न कार्यालय अमदाबाद. किं. रु. ३. (८) मरुभूमिमांः— एल्. के. मेघाणी १४ अमरत लाल स्ट्रीट, कलकत्ता किं. रु. ३॥. (९) राजबालाः-दवाणी एन्ड कंपनी, मुंबई २. किं ४।. (१०) 'राधाराणी':- जीवन साहित्य मंदिर, अमदाबाद, किं. रु. ४. (११) मारी जीवन-कथा— नवजीवन कार्यालय, अमदाबाद, किं. रु. ८. (१२) 'राजाजी':— बृहद्-गुजरात प्रकाशन मंदिर, अमदाबाद किं. रु. ४॥. (१३) 'अरविन्द ने तेमनो आश्रमः— श्री. अरविंद प्रकाशन, आणंद किं. रु. १।. (१४) आश्रम संदेशः— श्री. अरविंद प्रकाशन, आणंद किं. रु १।. (१५) 'मिलाप'— महेन्द्र मेघाणी, ६६ आग्रा रोड, नॉर्थ कुर्ला, मुंबई; वार्षिक वर्गणी रु. ६॥.

# संपादकीय

दि. २६ जानेवारीस प्रजासत्ताक भारताची राज्यघटना आमलांत आली ही ह्या तिमाहींतील सर्वश्रेष्ठ घटना होय. पूर्वकाल दिव्य असलेल्या भारताला ही घटना उज्ज्वल भवितव्याकडे नेवो आणि प्रजासत्ताक भारत चिरायु होवो.

ह्या सुदिनानिमित्त भारतांत सर्वत्र उत्सव करण्यांत आला. नियतकालिकांनी विशेषांक काढून त्या उत्सवाचें माहात्म्य आणि घटनेचें स्वरूपवैशिष्ट्य वाचकांच्या मनीं ठसविण्याचें कार्य केलें. '**चित्रमय जगत्**'ने 'स्वतंत्र भारताचें ध्येयदर्शन' म्हणून काढलेला विशेषांक उल्लेखनीय आहे. त्याच महिन्यांत '**किर्लोस्कर**'चा शरीर-संवर्धन विशेषांक निघाला. 'शक्तीने' मिळतीं राज्यें, युक्तीने यत्न होतसे.' पण शक्ति-युक्ति-संयोगाशिवाय राष्ट्राला वैभवशाली दीर्घायुष्य नाहीं, हें पटविणारी ही योजकता स्वागतार्हच होय. ह्याच ओघांत '**जय महाराष्ट्र**'चा 'संयुक्त महाराष्ट्र' विशेषांक उल्लेखनीय असून प्रश्नाची निकड लक्षांत घेतां ही उठावण समयोचितच आहे.

**पत्रकार-परिषदेचें बेळगांव अधिवेशन** (फेब्रुवारी) चांगलेंच गाजलें. आचार्य अत्रे यांचें अध्यक्षीय भाषण त्यांच्या व्यक्तिमत्त्वास साजेसें—खणखणीत आणि पल्लेदार झालें व पुणें विद्यापीठास राणी पार्वतीदेवी कॉलेज जोडूं न देण्यांतला अन्याय घवघवीतपणें वेशीवर टांगण्यांत आला.

विलिंग्डन कॉलेजांतील मराठीचे प्राध्यापक शं. के. कानेटकर ( कवि गिरीश ) यांच्या सेवानिवृत्तिनिमित्त सत्कारसमारंभ झाला. त्यांच्या चहात्यांनी त्या निमित्त जो साडेतीन हजारचा निधि जमवला त्याचा विनियोग दोन पारितोषिकांसाठी व्हायचा आहे. ही योजना संस्थेस भूषणावह आणि कवीस अभिमानास्पद अशीच होय.

चांदा येथें विदर्भ साहित्य संघाचें अधिवेशन डॉ. मा. गो. देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली यशस्वीपणें पार पडलें. चालू वर्षी संघाचे अध्यक्षपदीं श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांची निवड झाली असून, नागपुरास 'विदर्भ साहित्य मंदिर' उभारण्याची त्यांची उभारी आहे. संघाचा उत्कर्ष होवो असें आम्ही चिंतितों.

**दिनविशेष :--** परिषदेचे एक कार्यकर्ते श्री. प्र. न. जोशी यांचा "भारतीय इतिहासाचें तिथिवार दर्शन" घडविणारा हा ग्रंथ म्हणजे "भारताचें कीर्तिमंदिर" च होय. संदर्भ ग्रंथ म्हणून त्याला महत्त्व असून, भारताच्या सुपुत्रांचें आणि सेवकांचें पुण्यस्मरण ह्या ग्रंथाने घडणार आहे. श्री. जोशी यांना धन्यवाद.

**शोचनीय निधन :--** 'हरि नारायण आपटे' ह्या चरित्रग्रंथाच्या लेखिका ( कु. वेणुताई पानसे, तथा ) सौ. निर्मलाबाई हर्षे यांचें निधन ( दि. ९-२-१९५० ) ही मोठीच हानी होय.

---

## सभासदांस विनंति

(१) वार्षिक साधारण सभेचें निमंत्रण पृष्ठ २७ वर आहे. अवश्य पहावें.

(२) नवीन वर्ष एप्रिलपासून सुरू झालें. साधारण सभासदांनी १९५०-५१ सालची वर्गणी रु. १ ( बाकीदार सभासदांनी बाकीसह ) पाठवावी.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## १९४९-५० चें इतिवृत्त.

**सभासद संख्याः**—वर्षअखेर सभासदांची संख्या एकूण १४७४ आहे. त्यापैकीं १०७३ साधारण असून उपकर्ते २, आश्रयदाते ६, सहाय्यक ८, हितचिंतक २४ व तह-हयात सभासद ३६१ अशी वर्गवारी आहे. म्हणजे यंदा सभासदसंख्येंत समारे शंभराने वाढ झालेली आहे. शाखासभा सभासदांखेरीज बाकीदार सभासदांची संख्या सुमारे शंभर आहे.

**आर्थिकस्थितिः**—सोबत जमाखर्चाचा तक्ता, पडताळा व ताळेबंद अशीं तीन पत्रकें जोडलीं आहेत. त्यांवरून परिषदेच्या आर्थिक स्थितीची कल्पना सभासदांस येईल.

**संमेलनः**—महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें ३२ वें अधिवेशन मे १९४९ मध्ये पुणें येथें ' पुणें नगर वाचन मंदिर ' या संस्थेच्यावतीने आचार्य शं. द. जावडेकर यांच्या अध्य-क्षतेखाली थाटानें पार पडलें. समेलनास जोडून प्रा. श्री. बा. रानडे यांच्या अध्यक्षतेखाली कवि संमेलनहि झालें. नाट्यप्रयोग, काव्यचर्चा, काव्यगायन, नकला, नृत्य, महाराष्ट्र-दर्शन-प्रदर्शन इत्यादि विविधप्रकारचे मनोरंजक व बोधप्रद कार्यक्रम संमेलनांत झाले. साहित्य संमेलनाचें आगामी ३३ वें अधिवेशन मुंबई येथे मे १९५० मध्ये ' मुंबई मराठी साहित्य संघा ' चें वतीने भरणार आहे.

**स्वाध्याय मंडळः**—परिषदेच्या वतीने होत असलेल्या परीक्षांना बसूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी दरवर्षीप्रमाणें याहि वर्षी प्राज्ञ–विशारद वर्ग चालू होते. दोन्ही वर्ग मिळून १५० वर विद्यार्थी होते. अध्यापनाचें कार्य प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. न. का. घारपुरे, डॉ. बा. मो. कानिटकर, श्री. प्र. न. जोशी, प्रा. चंद्रकुमार डांगे, श्री. ह. श्री. शेणोलीकर, प्रा. रा. शं. वाळिंबे, प्रा. श्री. के. क्षीरसागर, श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. अ. गं. मंगरूळकर, प्रा. गं. भा. निरंतर, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. रा. ना. गद्रे व प्रा. वा. दा. गोखले यांनी केलें. तसेंच नेमलेल्या कांही विषयांवर प्रा. रा. श्री. जोग, प्रा. न. र. फाटक, डॉ. के. ना. वाटवे, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे व कवि श्री. बा. भा. बोरकर यांनी व्याख्यानें दिलीं. विशारद वर्गाचें स्नेहसंमेलन होऊन वर्गाने परिषदेस एक टेबल-लँप व स्टेनलेस्टीलचा ट्रे भेट म्हणून दिला.

**स्मृतिदिनः**—ज्ञानकोशकार कै. श्रीधर व्यंकटेश केतकर यांचा स्मृतिदिन प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या हस्तें दि. १४।४।४९ ला साजरा झाला. कै. वा. म. जोशी यांच्या स्मृतिदिनाचे दिवशीं डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांचें ' महाराष्ट्रांतील व्यक्तित्वविकासाचा इतिहास, या विषयावर व्याख्यान झालें ( २०-७-४९ ) साहित्यसम्राट कै. न. चिं. केळकर स्मृति-दिनानिमित्त महामहोपाध्याय प्रा. द. वा. पोतदार यांचें व्याख्यान झालें. कै. माधवराव पटवर्धन स्मृतिदिन दि. २९।११।४९ रोजीं प्रा. रा. श्री. जोग यांच्या हस्तें पार पडला.

अनुक्रमणिका

**व्याख्यानें:**—परिषदेच्या स्वाध्यायमालेतर्फे दि. ६।८।४९ रोजीं प्रा. रा. शं. वाळिंबे यांचें ' प्राचीन साहित्य आणि ऐतिहासिक टीकेचा दृष्टीकोन ' या विषयावर व दि. १३-८-४९ रोजीं डॉ. के. ना. वाटवे यांचें ' केशवसुत आणि क्रांतिरस ' या विषयावर व्याख्यानें झालीं. जर्मन महाकवि गटे याच्या २०० व्या स्मृतिदिनानिमित्त दि. २३।८।४९ रोजीं प्रा. रा. शं. वाळिंबे यांचें ' जर्मन महाकवि गटे याचें जीवितकार्य ' या विषयावर व्याख्यान झालें.

**डांगी-बोली विषयक कार्य:**— परिषदेने नेमलेल्या संयुक्त महाराष्ट्र पोट समितीतर्फे कार्याध्यक्ष प्रा. रा. श्री. जोग यांनी दि. ३ ७-४९ रोजीं 'डांगी-बोली' या विषयावर प्रकट व्याख्यान दिलें व वृत्तपत्र प्रतिनिधींना मुलाखत दिली. प्रस्तुत भाषण यापूर्वी 'केसरी', 'लोकसत्ता' व 'साहित्य-पत्रिका' ( अंक ९१ ) या पत्रांतून लेखरूपानें प्रसिद्ध झालें आहे. परिषदेच्या विनंतीवरून डॉ. य. कृ. सोवनी यांनी किर्लोस्कर मासिकांत 'डांगची भाषा कोणती' या विषयावर लेख लिहिला. तो लेख छापल्याबद्दल व त्याची स्वतंत्र पत्रकें काढून दिल्याबद्दल परिषद् 'किर्लोस्कर'च्या संपादकांची आभारी आहे. दोन्ही पत्रकें सभासदांना वाटण्यांत येऊन तीं सरकारकडे योग्य त्या व्यवस्थेसाठी पाठविण्यांत आलीं. 'डांगी बोली' या विषयावर प्रा. जोग यांचीं मुंबई व कल्याण येथेंहि व्याख्यानें झालीं. याशिवाय खुद्द डांग जिल्ह्यांत आहवा येथे परिषदेच्या परीक्षाचें केंद्र स्थापन होऊन यंदा १५ विद्यार्थी परीक्षांस बसले. श्री. क्षेमकल्याणी, श्री. ना. भ. दीक्षित इत्यादि कार्यकर्ते डांगविषयक प्रश्नांत सहकार्य करीत असतात. डांगसेवा प्रमुख आ. बिडकर यांना परिषदेंत मुद्दाम पाचारण केलें. त्यांच्या बरोबर डांगच्या प्रश्नाचा विचार-विनिमय केला.

**तैलचित्रांचे अनावरण:**— यंदा परिषदेंत तीन तैलचित्रांचे अनावरण समारंभ झाले. दि. २७-४-४९ रोजीं आचार्य शं. द. जावडेकर यांच्या सत्कारप्रसंगीं त्यांच्याच हस्ते कै. काकासाहेब लिमये यांच्या तैलचित्राचा अनावरण समारंभ झाला. पुण्याचे सुप्रसिद्ध चित्रकार रा. सा. श्री. पिंपळखरे यांनी परिषदेस कै. न. चिं. केळकर व श्री. ना. गो. चापेकर यांचीं तैलचित्रें भेट म्हणून दिलीं. श्री. चापेकर यांच्या तैलचित्राचा अनावरण दि. १२-९-४९ रोजी मध्यवर्ति विधिमंडळाचे अध्यक्ष सन्माननीय नामदार ग. वा. उर्फ दादासाहेब मावळंकर यांच्या अध्यक्षतेखाली झालें. कै. केळकर यांच्या तैलचित्राचें अनावरण त्यांच्या स्मृतिदिनीं महामहोपाध्याय प्रा. पोतदार यांच्या हस्तें झालें.

**परिभाषा-मंडळ:**— परिषदेच्या परिभाषा मंडळाने विमा, जलवैजिक ( Hydro-electric ) व क्षेत्रपायानिक ( Irrigation ) या विषयांची परिभाषा तयार केली आहे. या कामीं मंडळाचे कार्यवाह श्री. त्र्यं. गो. ढवळे, प्रा. स. वि. आपटे इत्यादि तज्ज्ञांनी सर्वतोपरी साहाय्य केलें.

**प्रकाशन:**— परिषदेतर्फे प्रा. गं. बा. सरदार यांचें 'संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति' हें पुस्तक लवकरच प्रसिद्ध होत आहे.

**कै. वा. गो. आपटे-संदर्भ-ग्रंथ-संग्रहालय:**— कै. आपटे विश्वस्त मंडळाकडून दहा हजार रुपयांच्या आलेल्या देणगींतून 'संदर्भ-ग्रंथ-संग्रहालय' तयार करण्यांत आला. या देणगीबद्दल श्री. सहस्रबुद्धे, श्री. पुराणिक व श्री. जोशी या तिघां विश्वस्तांची व श्री. गोपीनाथ तळवळकर यांची परिषद् कायमची ऋणी आहे.

देणग्याः— 'केसरी-मराठा' संस्थेकडून ७५ पुस्तकें आपटे संदर्भ-ग्रंथ-संग्रहासाठी भेट म्हणून आलीं. कै. परशुरामतात्या गोडबोले यांचे पौत्र श्री. स. रा. गोडबोले यांजकडून अनेक पुस्तकें व हस्तलिखितें परिषदेला देणगीदाखल मिळालीं. 'ध्रुव' मासिकाचे संपादक श्री. रा. प्र. कानिटकर यांनी परिषदेच्या इमारतीचें छायाचित्र भेटीदाखल दिलें.

**संलग्नसंस्था व पत्रिकावर्गणीदार**— सभासद संख्येव्यतिरिक्त २८ संलग्नसंस्था व ५० पत्रिकावर्गणीदार परिषदेच्या पटावर आहेत.

**शाखासभा :**— सातारा, सोलापूर, अहमदनगर, नाशिक, कोल्हापूर, सांगली व नागपूर या ठिकाणीं परिषदेच्या शाखासभा असून त्यांचें कार्य समाधानकारकपणें चालू आहे. दक्षिण सातारा जिल्हा साहित्य सभेने यंदा पुढील कार्यक्रम केले. कै. साधुदास यांचा स्मृतिदिन, श्री. रा. के. रानडे यांचे 'हिंदुकोड' बिलावर व्याख्यान, कै. नाट्याचार्य खाडिलकर यांच्या स्मृतिदिनांत व कवि गिरीश यांच्या सत्कारांत सहकार्य व परीक्षावर्ग. करवीर साहित्य सभेतर्फे मॅट्रिक विद्यार्थ्यांकरता प्रा. ना. सी. फडके व वि. स. खांडेकर याची विनामूल्य व्याख्यानें करण्यात आलीं व प्राचार्य गोकाक यांचें 'कानडी वाङ्मयाचे कांही विशेष' या विषयावर व्याख्यान करण्यांत आलें. सभेने परिक्षावर्गही चालविले.

साहित्य सभा सातारा या संस्थेच्या वतीने राजकवि यशवंत, तर्कतीर्थ जोशी, प्रा. दे. द. वाडेकर, श्री. श्री. शं. नवरे, इतिहासकार गो. स. सरदेसाई यांचीं व्याख्यानें झालीं. या सभेचे कार्यवाह श्री. मो. रा. वाळंबे व श्री. अ. ग. करंदीकर हे आहेत. परीक्षाचे वर्ग चालविण्यांत चिटणीसांना श्री. ना. ह. टिळक व प्रा. के. गो. नित्सुरे यांची बहुमोल मदत झाली.

सोलापूर शाखासभेने यावर्षी साहित्यिक, कवि व पत्रकार यांचीं जिल्हासंमेलनें भरवून मोठे कार्य केलें. त्याशिवाय कन्नड साहित्यपरिषदेसाठी आलेल्या कन्नड साहित्यिकांचा सत्कार केला ही मोठी अभिनंदनीय कामगिरी आहे. साप्ताहिक बैठका, परस्थांचे सत्कार वगैरे कार्यें नेहमी चालू असतात.

**भारतीय-घटना-परिभाषा :**— ही परिभाषा तयार करणाऱ्या समितीवर परिषदेचे एक उपाध्यक्ष कोशकर्ते श्री. य. रा. दाते यांची भारतसरकारने नियुक्ति केली होती. श्री. दाते यांनी प्रा. जोग, प्रा. मंगरूळकर, प्रा. गोखले, श्री. फके इत्यादि परिषदेच्या कार्यकर्त्यांबरोबर चर्चा केली. या चर्चेतून निष्पन्न झालेले बरेच शब्द मान्य झाले आहेत. परिषदेचे उपाध्यक्ष प्रा. न. र. फाटक यांचीं लखनौ विद्यापीठांत मराठी भाषेसंबंधीं तीन व्याख्यानें झालीं. लखनौ विद्यापीठाने त्यांना मुद्दाम निमंत्रण केलें होतें.

**अधिकारी मंडळाच्या सभा :**— कार्यकारी मंडळाच्या ७, नियामक मंडळाची १ व साधारण सभेची एक अशा सभा भरून निरनिराळ्या योजना व नित्यनैमित्तिक कामें यांसंबंधी चर्चा व ठराव करण्यांत आले. कार्यकारी मंडळात यंदा झालेली विशेष घटना म्हणजे गेलीं तीन वर्षें कार्याध्यक्षाच्या जागीं असलेले प्रा. श्री. म. माटे यांचा राजीनामा ही होय. प्रा. माटे यांनी परिषदेंत अनेक योजना हातीं घेऊन त्याना जोराची चालना दिली. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर स्मारक मंदिर, मराठी भाषा व वाङ्मय याचा इतिहास, वा. गो. आपटे संदर्भ-ग्रंथ—संग्रह, वार्षिक वाङ्मय-समालोचन इत्यादि कार्यें त्याच्याच प्रोत्साहनाने

सुरू झाली. गतवर्षी कार्याध्यक्षपदी ते अविरोध निवडूनहि आले. परंतु त्यांनी कार्याध्यक्ष-पदाचा राजीनामा दिला व तो १४।५।४९ रोजीं भरलेल्या वार्षिक साधारण सभेंत संमत झाला. प्रा. माटे यांचे जागीं कार्याध्यक्ष म्हणून प्रा. रा. श्री. जोग हे अविरोध निवडून आले. प्रा. जोग यांच्या रिकाम्या झालेल्या जागेवर कार्यकारी मंडळाने श्री. गोपीनाथ तळवलकर यांना स्वीकृत करून घेतलें.

**इतर :—** दिल्ली येथे ६, ७ ऑगस्ट रोजीं भरलेल्या ' राष्ट्र-भाषा-व्यवस्था ' परिषदेसाठी प्रा. अ. गं. मंगरूळकर हे प्रतिनिधि म्हणून गेले होते. मुंबई सरकारच्या लिपि-सुधारणा समितीवर प्रा. वा. दा. गोखले यांनी परिषदेचे प्रतिनिधि म्हणून काम केलें. श्री संत तुकाराम महाराजांचा त्रिशत सांवत्सरिक उत्सव साजरा करण्याबद्दल परिषदेने सर्व शाखा-सभांना व संलग्न संस्थांना आदेश दिला व परिषदेतहि प्राचार्य सोनोपंत दांडेकर यांच्या अध्यक्षतेखाली तो थाटांत पार पडला.

**महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका:—**वृत्तांतावर्षांत राजकवि य. दि. पेंढरकर यांच्या संपादकत्वाखालीं पत्रिकेचे चार अंक निघाले. पत्रिकेला परतभेट म्हणून पुढील नियतकालिकें येत असतात. या सर्व नियतकालिकांच्या संपादक-व्यवस्थापकांची परिषद् अतिशय आभारी आहे.

**दैनिकें—** ( १ ) ज्ञानप्रकाश ( २ ) सकाळ ( ३ ) लोकशक्ति ( ४ ) काळ ( ५ ) भारत ( ६ ) प्रभात ( मुंबई ) ( ७ ) लोकसत्ता ( ८ ) नवभारत ( ९ ) तरुण-भारत

**द्विसाप्ताहिक—**केसरी.

**पाक्षिक—** बालसन्मित्र.

**साप्ताहिकें —** ( १ ) नवयुग ( २ ) धनुर्धारी ( ३ ) मौज ( ४ ) भवितव्य ( ५ ) समाधान ( ६ ) जनवाणी ( ७ ) अखंड-भारत ( ८ ) चिकित्सक (९) युगांतर (१०) मशाल ( ११ ) अर्थ ( १२ ) महाराष्ट्र ( नागपूर ) १३ विजय ( १४ ) मालवण-पत्रिका ( १५ ) भारतीय प्रवासी ( १६ ) मराठवाडा. ( १७ ) प्रबोधचंद्रिका ( १८ ) Merdeka ( १९ ) People's Raj.

**मासिकें —** ( १ ) विशालभारत ( हिंदी ) ( २ ) किर्लोस्कर ( ३ ) स्त्री ( ४ ) मनोहर ( ५ ) सह्याद्रि ( ६ ) यशवन्त ( ७ ) चित्रमयजगत् ( ८ ) ध्रुव ( ९ ) व्यायाम ( १० ) पुरुषार्थ ( ११ ) महाराष्ट्र ( १२ ) वाङ्मयशोभा ( १३ ) अभिरुचि ( १५ ) युगवाणी ( १६ ) सत्यकथा ( १७ ) कुमार ( १८ ) राष्ट्रवाणी ( हिंदी ) ( १९ ) रोहिणी ( २० ) वसंत ( २१ ) पराग ( २२ ) प्रसाद ( २३ ) नवभारत ( २४ ) पूजा ( २५ ) प्रेमबोध ( २६ ) महाराष्ट्र-विस्तार ( २७ ) गुरुदेव ( २८ ) हिंदु ( २९ ) धर्मचक्र ( ३० ) संजीवन ( ३१) चित्ररेखा ( ३२ ) आपली शेती ( ३३ ) भारतमित्र ( ३४ ) सुषमा, (३५) रयत (३६) व्यायाम (३७) एकता (३८) सुमन ( ३९ ) P. E. N. (४०) महात्मा.

**द्वैमासिकें—**(१) साहित्य. (२) नवा महाराष्ट्र.

**त्रैमासिकें—** ( १ ) भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-त्रैमासिक ( २ ) Bulletin of the Deccan College Post Graduate Research Institute, Poona. ( ३ ) नागरी प्रचारिणी पत्रिका ( ४ ) तत्त्वज्ञानमंदिर ( ५ ) भांडारकर रिसर्च इन्स्टि-ट्यूटचें नियतकालिक. ( ६) शोधपत्रिका. (७) मावसी.

परीक्षा—१९४९ डिसेंबरमध्ये झालेल्या परीक्षांना पुढीलप्रमाणे उमेदवार बसले व उत्तीर्ण झाले.

| | | | |
|---|---|---|---|
| आचार्य | १६ | पैकी | उत्तीर्ण १ |
| विशारद | १९७ | — | — ८२ |
| प्राज्ञ | ८८३ | — | — ३७५ |
| प्रवेश | ९६५ | — | — ५३१ |
| प्रथमा | १०८७ | — | — ७८४ |
| एकूण | ३१४८ | | १७७३ |

## परीक्षाकेंद्रे

| क्रमांक | केंद्राचें नांव | परीक्षास्थळ | केंद्राधिकाऱ्याचें नांव |
|---|---|---|---|
| १ | मुंबई ४ | श्री. सरस्वती गर्ल्स् स्कूल | कु. पिरोज आनंदकर. |
| २ | दादर | जनरल एज्यु. इन्स्टि. हायस्कूल | श्री. स. ह. कुलकर्णी. |
| ३ | परळ | आर. एम्. भट हायस्कूल | प्रि. मो. वा. दोंदे. |
| ४ | विलेपारले | पार्ले टिळक विद्यालय | श्री. मा. सी. पेंढारकर. |
| ५ | ठाणें | जनरल एज्यु. इन्स्टि. हायस्कूल | श्री. रा. वि. थोरात. |
| ६ | अंबरनाथ | म. गांधी विद्यालय | श्री. नी. अ. कोर्डे. |
| ७ | डहाणू | खाजगी इमारत | श्री. वीरेन्द्र अढीया |
| ८ | पुणें | नूतन मराठी विद्यालय | प्रा. वा. मा. दवडघाव. |
| ९ | पुणें | रास्तापेठ एज्यु. हायस्कूल | द. पि. अत्रे. |
| १० | जुन्नर | न्यू. स्कूल | श्री. वि. रा. नगरकर. |
| ११ | सातारा | न्यू. इं. स्कूल | श्री, के. गो. नित्सुरे. |
| १२ | अष्टे | हायस्कूल | श्री. ग. त्रिं. जोशी. |
| १३ | कऱ्हाड | श्री. शिवाजी विद्यालय | श्री. वि. गं. सप्रे. |
| १४ | तासगांव | तासगांव हायस्कूल | श्री. नि. वि. परचुरे. |
| १५ | वोरगांव | श्री समर्थ मंदिर | श्री. गो. रा. कुलकर्णी. |
| १६ | वाई | द्रविड हायस्कूल | श्री. ग. म. जोशी. |
| १७ | विटें | म. गांधी विद्यामंदिर | श्री. गुं. दा. कंपली. |
| १८ | सावर्डे | श्री भवानीदेवी इं. स्कूल | श्री. र. शा. निलकंठ. |
| १९ | अहमदनगर | कन्याविद्यामंदिर | श्री. ग. ज. चितांबर. |
| २० | कोपरगांव | श्री. गो. विद्यालय | श्री. मा. वि. केतकर. |
| २१ | संगमनेर | पेटिट हायस्कूल | श्री. ना. के. उपासनी. |
| २२ | सोलापूर | ह. दे. हायस्कूल | श्री. कृ. ना. पिले. |
| २३ | अक्कलकोट | शहाजी हायस्कूल | ,, रा. ज. जकातदार. |
| २४ | कुर्डूवाडी | लो. बो. मुलांची शाळा | ,, श्री. के. दिवाकर. |
| २५ | पंढरपूर | कवठेकर हायस्कूल | ,, बा. रा. रत्नपारखी. |

| क्र. | केंद्राचें नांव | परीक्षास्थळ | केंद्राधिकाऱ्याचें नांव |
|---|---|---|---|
| २६ | बार्शी | मॉडेल हायस्कूल | श्री. रा. ग. नाडकर. |
| २७ | बार्शी | सि. ज्यु. हायस्कूल | ,, श. शि. चनशेटी. |
| २८ | बार्शी | सुलाखे हायस्कूल | ,, वा. ज. खेर. |
| २९ | नाशिक | पेठे विद्यालय | ,, मा. श्री. मराठे. |
| ३० | नांदगांव | वै. जि. हायस्कूल | ,, गो. ना. देवळे. |
| ३१ | निवाणा | मुलांची शाळा | ,, दो. ना. पाटील. |
| ३२ | मालेगांव कँप | न्यू. इं. स्कूल | ,, गो. वा. गोरवाडकर. |
| ३३ | येवला | म्युनि. हायस्कूल | ,, भि. व्यं. गुर्वी. |
| ३४ | जळगांव | न्यू इंग्लिश स्कूल | ,, मनुभाई देसाई. |
| ३५ | अमळनेर | प्रताप कॉलेज | प्रा. म. वि. फाटक. |
| ३६ | खिर्डी | इंग्रजी शाळा | श्री. ह. शि. मंगाळे. |
| ३७ | खिरोदें | मराठी मुलाची शाळा | ,, धों. भि. नारखेडे. |
| ३८ | चाळिसगांव | प्रा. अ. विद्यालय | प्रा. ल. नी. छापेकर. |
| ३९ | तळई | मराठी शाळा | श्री. दे. ता. पाटील. |
| ४० | थोरगव्हाण | डी. एस्. डी. हायस्कूल | ,, ग. शं. पाटील. |
| ४१ | धरणगांव | पी. आर. हायस्कूल | ,, क. त्र्यं. पुराणिक. |
| ४२ | नांदेड | मराठी शाळा | ,, चिं. दि. अत्तरदे. |
| ४३ | पारोळे | हायस्कूल | ,, मो. रा. कुलकर्णी. |
| ४४ | फैजपूर | म्युनि. हायस्कूल | ,, आर. पी. चौधरी. |
| ४५ | पाडळसें | लो. बो. मराठी शाळा | ,, सी. सो. चौधरी. |
| ४६ | भडगांव | न्यू इं. स्कूल | ,, मु. त्र्यं. मुजुमदार. |
| ४७ | भुसावळ | द. शि. हायस्कूल | ,, व्यं. दा. काळवीट. |
| ४८ | यावल | सिमकॉक्स हायस्कूल | ,, पं. खु. अट्रावलकर. |
| ४९ | वरणगांव | म. गांधी विद्यालय | ,, मा. वा. काकडे. |
| ५० | शेंदूर्णी | न्यू. इं. स्कूल | ,, शं. का. घाटे. |
| ५१ | सांगवी बु॥ | मराठी शाळा | ,, तु. रा. चौधरी. |
| ५२ | सावदा | आ. गं. हायस्कूल | श्री. स. भि. वारके. |
| ५३ | धुळें | आघाव प्रा. ट्रे. कॉलेज | प्रा. एच्. एम्. पाटील. |
| ५४ | तळोदें | के. डी. हायस्कूल | श्री. ना. रं. लिमये. |
| ५५ | नंदुरबार | म्युनि. हायस्कूल | श्री. शं. रा. जोशी. |
| ५६ | शहादें | न्यू. इं. स्कूल | श्री. ब्रि. कि. शहा. |
| ५७ | अलिबाग | इंडस्ट्रिअल स्कूल | श्री. शं. ह. गोगटे. |
| ५८ | पनवेल | अध्यापक विद्यालय | प्रा. नो. शं. नवरे. |
| ५९ | पेण | गांधी मंदिर | श्री. दि. म. ताटके. |
| ६० | महाड | हायस्कूल | श्री. वि. त्र्यं. चांदे. |
| ६१ | चिपळूण | मराठी शाळा क्र. १ | श्री. गो. ग. कुलकर्णी. |
| ६२ | मालवण | लक्ष्मीबाई टोपीवाला कन्याशाळा | श्री. वि. अ. आजगांवकर. |

| क्र. | केंद्राचें नांव | परीक्षास्थळ | केंद्राधिकाऱ्याचें नांव |
|---|---|---|---|
| ६३ | रत्नागिरी | महिला विद्यालय | सौ. मालतीबाई जोशी. |
| ६४ | वेंगुर्लें | श्री. मंगेश विद्यालय | श्री. के. म. देशपांडे. |
| ६५ | बेळगांव | वाङ्मय चर्चा मंडळ | श्री. बा. रं. सुंठणकर. |
| ६६ | चिकोडी | रा. घों. विद्यालय | श्री. द. कृ. हेब्बाळकर. |
| ६७ | निपाणी | म्युनि. हायस्कूल | श्री बा. रा. कुलकर्णी. |
| ६८ | येल्लूर | राष्ट्रभाषा विद्यालय | श्री. धी. गो. मेलगे. |
| ६९ | कोल्हापूर | राजाराम हायस्कूल | श्री. अ. बा. देशपांडे. |
| ७० | शिरोळ | मु. ता. हायस्कूल | श्री. द. ग. शिंदे. |
| ७१ | सांगली | सिटी हायस्कूल | श्री. गो. ग. मराठे. |
| ७२ | अकोला | सीताबाई आर्ट्स् कॉलेज | प्रि. ग. द. जोशी. |
| ७३ | अमरावती | श्री. रामकृष्ण विद्यालय | श्री. दा. अ. पंत. |
| ७४ | उमरखेड | गव्हर्नमेंट हायस्कूल | श्री. बी. डी. महाजन. |
| ७५ | खामगांव | टिळक राष्ट्रीय विद्यालय | श्री. मु. श्री. पंघे. |
| ७६ | नागपूर | सिटी कॉलेज | प्रा. पां कृ. सावळापूरकर. |
| ७७ | सिंदी | आय्. इ. एम्. हायस्कूल | श्री. ने. वि. फुर्सुले. |
| ७८ | हैद्राबाद | विवेक वर्धिनी विद्यालय | श्री. नं. शे. पोहनेरकर. |
| ७९ | अंबेजोगाई | श्री. यो. नू. विद्यालय | श्री. ए. मा. कुलकर्णी. |
| ८० | आष्टी | नवयुवक संघ वाचनालय | श्री. भी. ना. झेंड. |
| ८१ | औरंगाबाद | श्री. सरस्वतीभुवन हायस्कूल | श्री. न. द. वाघ. |
| ८२ | उंबरगे | खाजगी हायस्कूल | मुख्याध्यापक. |
| ८३ | गुलबर्गा | नूतन विद्यालय | श्री. वि. शा. वळसंगकर. |
| ८४ | जालना | मिशन हायस्कूल | श्री. उत्तमराव देशपांडे. |
| ८५ | परभणी | नूतन प्राथमिक विद्यालय | श्री. मालचंद्र कहाळेकर. |
| ८६ | नांदेड | प्रतिभा निकेतन | श्री. ग. ना. आंबेकर. |
| ८७ | शांतिसदन | अनंत विद्यालय | श्री. गुंडेराव तुर्कीपल्लीकर. |
| ८८ | सेलू | नूतन विद्यालय | श्री. गो. बा. देशमुख. |
| ८९ | लातूर | मारवाडी राजस्थान विद्यालय | श्री. रामप्रतापजी परिहार. |
| ९० | बडोदें | स्त्री. अध्यापन पाठशाळा | प्रा. ना. म. पटवर्धन. |
| ९१ | इंदूर | म. सा. भुवन | श्री. म. रा. उपासनी. |
| ९२ | उज्जयिनी | देवासद्वार माध्यमिक पाठशाळा | प्रा. बा. ना. मुंडी. |
| ९३ | आहवा (डांग) | खाजगी इमारत | श्री. ना. भ. दीक्षित. |

**परीक्षकः**—पुढील सद्गृहस्थांनी परीक्षक म्हणून काम केलें.

डॉ. वि. भि. कोलते, डॉ. मा. गो. देशमुख, प्रा. गं. बा. सरदार, प्रा. वा. ल. कुलकर्णी, प्रा. वि. ह. कुलकर्णी, प्रा. श्री. के. क्षीरसागर, प्रा. श्री. रा. पारसनीस, प्रा. रा. शं. वाळिंबे, डॉ. म. अ. करंदीकर, प्रा. गं. भा. निरंतर, प्रा. वि. म. कुलकर्णी, प्रा. म. वि. फाटक, प्रा. अ. गं. मंगरूळकर, प्रा. अ. ना. देशपांडे, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, प्रा. म.

ना. अदवन्त, डॉ. गं. ब्र. ग्रामोपाध्ये, प्रा. वि. बा. आबेकर, श्री. र. वि. हेरवाडकर, प्रा. दु. का. सन्त, श्री. शं. बा. आंबेकर, श्री. ग. वि. अकोलकर, श्री. मो. रा. वाळंबे, प्रा. चन्द्रकुमार डांगे, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. ब्रा. मो. कानिटकर, श्री. क. श्री. काळे, श्री. बा. वा. देवधर, श्रीयुत श्री. ह. अत्तरदे, श्री. गो. वि. वैद्य, श्री. वा. ज्यो. देशपांडे, श्री. प्र. न. जोशी, श्री. वा. श्री. पुरोहित, श्री. वि. ना. दांडेकर, प्रा. सौ. सरोज शेंडे, श्री. धों. वा. गद्रे, श्री. व. ब्रा. मणेरीकर, श्री. तु. ता. सावंत, श्री. म. दा. साठे, श्री. एम्. के. अनगळ, श्री. गु. अ. देशमुख, श्री. स. का. गोखले, श्री. न. शे. पोहनेरकर, प्रा. शां. पा. बंडेलू, कु. सरोजिनी बाब्रर, श्री. बा. रं. सुंठणकर, श्री. पु. रा. पारनेरकर, श्री. कृ. शे. मार्डीकर, श्री. लीलाताई साठे, श्री. वि. श्रा. चौधरी, श्री. व. द. जोशी, प्रा. वा. दा. गोखले.

परिषदेच्या कार्यांत अनेकांचें अनेक तऱ्हेने साहाय्य होत आहे, त्याबद्दल परिषद सर्वांची ऋणी आहे.

अ. ना. भालेराव
वा. द्रा. गोखले
अ. गं. मंगरूळकर
चिटणीस.

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

अंदाजपत्रक १९५०-१९५१

**जमा**

| खात्याचें नांव | |
|---|---|
| १. ट्रस्टीकडून येणारें व्याज | १०००-०-० |
| २. साधारण सभासद वर्गणी | २८००-०-० |
| ३. पत्रिका वर्गणी | २००-०-० |
| ४. संलग्न संस्था वर्गणी | ८१-०-० |
| ५. ग्रंथविक्री | १२००-०-० |
| ६. परीक्षाशुल्क | १००००-०-० |
| ७. मा. प. सा. देणगी | ३००-०-० |
| ८. इतर | २००-०-० |
| ९. संमेलन | २००-०-० |
| एकूण | १५९८१-०-० |

**खर्च**

| खात्याचें नांव | |
|---|---|
| १. पगार खातें | ३३५०-०-० |
| २. वीज | १००-०-० |
| ३. मुईभाडें | १५-०-० |
| ४. म्यु. कर | ५३-१०-० |
| ५. कार्यालय छपाई | ३००-०-० |
| ६. ,, टपाल | २००-०-० |
| ७. सादिल | १००-०-० |
| ८. आतिथ्य | २००-०-० |
| ९. उपसमिति | ५०-०-० |
| १०. किरकोळ | ३००-०-० |
| ११. ठराव अंमल बजावणी | ५०-०-० |
| १२. कार्य. व नियामक सभा | ५००-०-० |
| १३. पत्रिका | ३०००-०-० |
| १४. इमारत दुरुस्ती | ५०-०-० |
| १५. नवीन सामान | १००-०-० |
| १६. निवडणूक | १००-०-० |
| १७. परीक्षा | ५०००-०-० |
| १८. शाखा सभा | २५०-०-० |
| १९. प्रकाशन | १०००-०-० |
| २०. घसारा | ५००-०-० |
| २१. प्रवास-प्रचार | ५००-०-० |
| २२. ग्रंथालय | २००-०-० |
| शिल्लक | ६२-६-० |
| एकूण | १५९८१-०-० |

# महाराष्ट्र साहित्य

## १६ मार्च १९४९ ते ५ मार्च १९५० पर्यंतच्या मुदतीचें

### जमा

| | | |
|---|---|---|
| देणगी:— | | |
| माधवराव पटवर्धन साहित्य-मंदीर | | ३१८-१४-९ |
| वर्गणी:— | | |
| साधारण समासद | २३०९–०–० | |
| संलग्न संस्था वर्गणी | ७४–०–० | |
| पत्रिका वर्गणी | १४१-१२-० | २५२४-१२-० |
| संमेलन:— | | ४५०–०–० |
| ग्रंथविक्री:— | | १४१८–०–९ |
| इतर जमा:— | | |
| परीक्षा शुल्क | १२२९४-१२-३ | |
| जाहिरात | ७५-१२-० | |
| व्याज व इतर | ३३९-१२-९ | १२७१०–५–० |
| एकूण ... | | १७४२२–०–६ |

# परिषद्, पुणें.

आयव्यय-पत्रक.

## खर्च

| | | |
|---|---|---|
| व्यवस्था खर्चः— | | |
| पगार | २९७९–५–३ | |
| भुइमाडें व म्युनिसिपल कर | ६८-१०-० | |
| वीज | ९७–५–९ | |
| कार्यालय छपाई व सादिल | ३२४–५–३ | |
| टपाल व तारखर्च | १२५–७–६ | |
| प्रवास | १२४–०–० | |
| आतिथ्य | १६५–५–६ | ३८८४–७–३ |
| सभा व उपसमितीः— | | |
| कार्यकारी व नियामक सभा | १२१-१२-० | |
| शाखा सभा | १४४–०–० | |
| उपसमिती | ४०–४–० | ३०६–०–० |
| परीक्षा खर्चः— | | ५६०२-१३-३ |
| पत्रिका खर्चः— | | ३२१८–८–९ |
| प्रकाशन खर्चः— | | १५६२–०–० |
| इमारत दुरुस्ती वगैरेः— | | १२४-१२-० |
| इतर | | |
| निवडणूक | १३१-११-० | |
| किरकोळ | २३७-१०-० | ३६९–५–० |
| घसाराः— | | |
| घसारा फंडाकडे वर्ग | | ५००–०–० |
| वरील मुदतीतील उत्पन्नाचा खर्चावरील वाढावा | | १८५४–२–३ |
| | एकूण ... | १७४२२–०–६ |

तपासलें, बरोबर आहे.

(सही) जी. एम्. ओक आणि कंपनी,

चार्टर्ड अकौंटंट्स्.

( ऑनररी ऑडिटर्स. )

# महाराष्ट्र साहित्य

## ता. ५ मार्च १९५० चा

### निधि व देणें

| | | |
|---|---|---|
| सामान्य निधि:— | | |
| सालगुदस्त ताळेबंदाप्रमाणे | १२४६७–९–० | |
| चालू मुदतीचा वाढावा | १८५४–२–३ | १४३२१–११–३ |
| इमारत निधि:— | | |
| सालगुदस्त ताळेबंदाप्रमाणे | | २३९३८– २–० |
| ग्रंथ संग्रहालय निधि:— | | |
| सालगुदस्त ताळेबंदाप्रमाणे | ७५६१–२–६ | |
| अधिक आपटे ट्रस्टकडून | ५१२१–९–६ | १२६८२–१२–० |
| इतिहास योजना निधि:— | | |
| सालगुदस्त ताळेबंदाप्रमाणे | | १९९८– ८–० |
| चिपळूणकर स्मारक निधि:— | | |
| सालगुदस्त ताळेबंदाप्रमाणे | १४१७५–१–० | |
| चालू मुदतीतील जमा | १५४४–०–० | १५७१९– १–० |
| कायम सामान घसारा निधि :— | | १६००– ०–० |
| देणीं:— | | |
| प्राव्हिडंट फंड | ४९१–९–९ | |
| इतर | ३०३-१५-३ | ७९५– ९–० |
| | एकूण ... | ७१०५५–११–३ |

# परिषद्, पुणें

## ताळेबंद

**जिंदगी व येणें**

| | | |
|---|---|---|
| इमारत (पडतर खर्च):— | | |
| सालगुदस्त ताळेबंदाप्रमाणें | | २९२०२-५-६ |
| कायम सामान (पडतर खर्च):— | | |
| कार्यालय | २१४६-८-९ | |
| ग्रंथ संग्रहालय | ७५३८-१५-६ | ९६८५-८-३ |
| ट्रस्टीजकडून येणें:— | | १४८८-६-९ |
| ठेवी:— | | |
| डेक्कन एज्युकेशन सोसायटी | | २३०००-०-० |
| शिल्लक:— | | |
| रोख शिल्लक | १३५-१४-० | |
| महाराष्ट्र बँक लि. चालू खातें | ७०५१-१५-० | |
| ,, सेव्हिंग खातें | ४९१-९-९ | |
| (प्रॉव्हिडन्ट फंड खातें):— | | ७६७९-६-९ |
| | एकूण ... | ७१०५५-११-३ |

आम्ही "महाराष्ट्र साहित्य परिषद्" पुणें या संस्थेचा ता. ५ मार्च १९५० अखेरचा ताळेबंद व ता. १६ मार्च १९४९ ते ता.५ मार्च १९५०पर्यंतच्या मुदतीचें आय-व्यय पत्रक तपासलें. परिषदेच्या हिशेबाच्या पुस्तकावरून व आम्हांस मिळालेल्या माहिती व खुलाशावरून सदरहू ताळेबंद परिषदेची खरोखर वस्तुस्थिति दर्शवीत आहे. सदरहू ताळेबंदामध्ये परिषदेच्या ट्रस्टची जिंदगी व त्याचे हिशेब यांचा समावेश केलेला नाहीं.

जी. एम्. ओक आणि कंपनी.
चॉर्टर्ड अकौंटंट्स्.
ऑनररी ऑडिटर्स.

दि. १२-३-१९५०.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, पुणें

## १९४९–१९५० सालाचा जमाखर्चाचा अंदाजपत्रकाशीं पडताळा

### जमा

| खातें | अंदाज १९४९–१९५० | प्रत्यक्ष १९४९–१९५० | | अंतर |
|---|---|---|---|---|
| ट्रस्टी | १०००–०–० | ...... | – | १०००–०–० |
| साधारण सभा. वर्गणी | ३०००–०–० | २३०९–०–० | – | ६९१–०–० |
| पत्रिका वर्गणी | २००–०–० | १४१-१२-० | – | ५८–४–० |
| संलग्न संस्था वर्गणी | ८१–०–० | ७४–०–० | – | ७–०–० |
| ग्रंथविक्री | १२००–०–० | १४१८–०–९ | + | २१७-१५-३ |
| परीक्षा शुल्क | ८३००–०–० | १२२९४-१२-० | + | ३९९४-१२-० |
| मा. प. सा. देणगी | २००–०–० | ३१८-१४-९ | + | ११८-१४-९ |
| जाहिरात | १००–०–० | ७५-१२-० | – | २४–४–० |
| व्याज व इतर | १००–०–० | ३३९-१२-० | + | २३९-१२-० |
| संमेलन देणगी | २००–०–० | ४५०–०–० | + | २५०–०–० |

### खर्च

| खातें | अंदाज | प्रत्यक्ष | | अंतर |
|---|---|---|---|---|
| पगार | ३०००–०–० | २९७९–५–३ | – | २०-१०-९ |
| वीज | १००–०–० | ९७–५–९ | – | २-१०-३ |
| भुइभाडें | १५–०–० | १५–०–० | | .......... |
| म्युनिसिपल कर | ३७-१०-० | ५३-१०-० | + | १६–०–० |
| कार्यालय छपाई | ३००–०–० | २२४–९–० | – | ७५–७–० |
| ,, टपाल | २००–०–० | १२५–७–६ | – | ७४–८–६ |
| सादील | १००–०–० | ९९-१२-३ | – | ०–३–९ |
| आतिथ्य | २००–०–९ | १६५–५–६ | – | ३४-१०-६ |
| उपसमिति | ५०–०–० | ४०–४–० | – | ९-१२-० |
| किरकोळ | ३००–०–० | २३७-१०-० | – | ६२–६–० |
| ठराव अंमल बजावणी | ५०–०–० | ......... | – | ५०–०–० |
| कार्यकारी नियामक सभा | २००–०–० | १२१-१२-० | – | ७८–४–० |
| पत्रिका | ३००० -०–० | ३२१८–८–९ | + | २१८–८–९ |
| इमारत दुरुस्ती | १००–०–० | १२४-१२-० | + | २४ १२-० |
| नवीन सामान | १००–०–० | ............ | – | १००–०–० |
| निवडणूक | २००–०–० | १३१-११-० | – | ६८–५–० |
| परीक्षा | ४०००–०–० | ५६०२-१३-३ | + | १६०२-१३-३ |
| शाखासभा | २५०–०–० | १४४–०–० | – | १०६–०–० |
| प्रवास | ५००–०–० | १२४–०–० | - | ३७६–०–० |
| प्रकाशन | १०००–०–० | १५६२–०–० | + | ५६२–०–० |
| घसारा | ६००–०–० | ५००–०–० | – | १००–०–० |

